


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३४, अंक २, उन्हाळा २०१६

विद्वत्प्रमाणित त्रैमासिक
(Refereed Journal)

# भाषा आणि जीवन

भारतीय भाषावैज्ञानिक



सुनीतिकुमार चट्टोपाध्याय

सुनितीकुमार चटर्जी




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका : 'भाषा आणि जीवन'**
**विद्वत्प्रप्रमाणित नियतकालिक**

**आर.एन.आय. ४००४८/८ ISSN 2231-4059**

**संपादक :** प्र० ना० परांजपे, एच्-1, क्लॅरियन पार्क, पुणे 411067. **(M) 9422509638**
इ-पत्ता : pranaparanjpe@gmail.com.



**प्रकाशक, मुद्रक व व्यवस्थापकीय पत्रव्यवहार आणि वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता -**
आनन्द काटीकर, बी-5/16 , सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411051. संपर्क : **94216 10704**
**marathi.abhyas.parishad@gmail.com**

**मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411051. स्थिरभाष : (020) 2434 8756

**प्रकाशन : त्रैमासिक :**

हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर)

**वर्गणीचे दर**

| | वार्षिक | त्रैवार्षिक | पंचवार्षिक |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | १५०/- | ४००/- | ७००/- |
| संस्था : | २००/- | ५५०/- | ९००/- |

आजीव सभासदत्व-व्यक्तींसाठी : रु २,१००/-
या अंकाची किंमत : रु ४०/-

**जाहिरातीचे दर**

| पूर्ण पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|
| २,५००/- | १,५००/- | ८००/- |

**वर्गणी थेट बँकेत भरण्यासंबंधी सूचना**
खातेधारकाचे नाव : मराठी अभ्यास परिषद
खाते क्रमांक : 2005 716 4260
बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र
शाखा : टिळक मार्ग, पुणे
**IFSC : MAHB 0000041**
बँकेत वर्गणीचे पैसे भरल्यावर कृपया ९९२३६ ७१८२० किंवा ९४२१६१०७०४ या क्रमांकावर लघुसंदेश पाठवावा, अथवा पत्र किंवा इ-पत्र पाठवावे आणि आपले **नाव, पत्ता, वर्गणीची रक्कम, कालावधी इ० तपशील कळवावा.**

**सूचना :**

(१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या लेखांतील मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असेलच, असे नाही.

(२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांच्याकडून अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ आणि राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


मराठी अभ्यास परिषद

मराठी अभ्यास परिषद पत्रिका - भाषा आणि जीवन
वर्ष ३४, अंक २ : उन्हाळा २०१६

## अनुक्रमणिका



मुखपृष्ठ : सलिल वाघ

[ मुखपृष्ठावरील सुनीतिकुमार चटर्जी यांचे छायाचित्र प्रो० डॉ० सोनल कुलकर्णी, डेक्कन कॉलेज (भाषाविज्ञान विभाग) यांच्या प्रयत्नामुळे उपलब्ध झाले. ]

पान ६ वरील रेखाचित्र : गिरीश सहस्रबुद्धे

## विशेष निवेदन

गेले वर्षभर काही व्यवस्थापकीय अडचणींमुळे, ''मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन''चे अंक नियमितपणे निघू शकले नाहीत. याबद्दल क्षमस्व!

आगामी काळात आम्ही हे सारे अंक (कदाचित नेहमीपेक्षा कमी पानांचे) लागोपाठ प्रकाशित करण्याचा प्रयत्न करत आहोत. समृद्ध परंपरा असणाऱ्या आपल्या नियतकालिकाच्या नियमिततेत खंड पडणे योग्य नाही, याची आम्हाला जाणीव आहे. २०१७ ह्या वर्षाच्या अखेरपर्यंत मागे पडलेले सर्व अंक प्रकाशित होतील, असे प्रयत्न आम्ही करत आहोत. 'भाषा आणि जीवन'वरील आपला लोभ कायम ठेवावा, ही सर्व वाचक, अभ्यासक आणि वर्गणीदार यांना विनंती.

वर्ष ३३, अंक ४ : दिवाळी २०१५ व वर्ष ३४, अंक १ : हिवाळा २०१६ हे दोन अंक अनुक्रमे फेब्रुवारी २०१७ व मार्च २०१७मध्ये प्रसिद्ध झाले.

आता वर्ष ३४ अंक २ : उन्हाळा २०१६ व वर्ष ३४ : अंक ३ पावसाळा २०१६ हे दोनही अंक १ मे २०१७ रोजी प्रसिद्ध होत आहेत.

आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद



अनुक्रमणिका

# मराठी आणि भाषाविज्ञान

या अंकापासून पुढील काही अंकांच्या मुखपृष्ठांवर आम्ही भारतीय भाषावैज्ञानिकांना स्थान देत आहोत. सुरुवात भारतीय भाषावैज्ञानिकांचे भीष्माचार्य सुनीतिकुमार चटर्जी (=चट्टोपाध्याय) यांच्यापासून करीत आहोत. व त्यांच्या कार्याचा परिचय करून देणारा डॉ० रमेश धोंगडे यांचा या अंकासाठी मुद्दाम लिहिलेला लेखही या अंकात देत आहोत. पुढच्या अंकात डॉ० सुमन्त मंगेश कत्रे यांचा परिचय येईल.

प्राध्यापक सुनीतिकुमार चटर्जी आणि प्राध्यापक सुमन्त मंगेश कत्रे म्हणजे आधुनिक भारतातील भाषाविज्ञानाच्या क्षेत्रातले दोन दिग्गज. चटर्जींनी आधुनिक भाषाविज्ञानाच्या जागतिक नकाशावर भारताला आपले स्थान मिळवून दिले तर कत्र्यांनी भारताच्या आधुनिक विद्याक्षेत्राच्या नकाशात आधुनिक भाषाविज्ञान विषयाला आपले स्थान मिळवून दिले, असे डॉ. अशोक केळकर यांनी वर्ष १६ अंक ४ मध्ये लिहिले होते.

मराठीने मात्र भाषाविज्ञानाला फारसे जवळ केलेले दिसत नाही. उदाहरणार्थ, ''भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण : महाराष्ट्र'' या ग्रंथाच्या ''मराठी'' या शीर्षकाच्या लेखात क्र० १०चा छेदक ''भाषाशास्त्रीय अभ्यासा''चा आढावा घेतो. त्याच्यात दोन उपविभाग आहेत : 'पारंपरिक व्याकरण विचार' आणि 'आधुनिक भाषाशास्त्रीय विचार' सुमारे ५४ पृष्ठांच्या या लेखात भाषाविज्ञानावरील लेखनाला जेमतेम एक परिच्छेद देण्यात आला आहे. त्यातही डॉ० अशोक केळकरांच्या 'मध्यमा' आणि 'वैखरी' (वास्तविक 'वैखरी' हे 'मध्यमा'च्या आधी सुमारे १८ वर्षे प्रकाशित झाले आणि त्याचे उपशीर्षक ''भाषा आणि भाषाव्यवहार'' असे आहे. पण या निबंध-लेखिकेने ते उपशीर्षक ''मध्यमा''ला चिकटवले आहे.) यांना शेवटचे स्थान देण्यात आले आहे. एवढेच नव्हे, तर ''समकालीन संरचानात्मक आणि व (मुळाबरहुकूम) वर्णनात्मक दृष्टिकोनांतूनही भाषाशास्त्रीय'' लेखनांमध्ये श्री०ना० गजेंद्रगडकर, मिलिंद मालशे, कल्याण काळे, अंजली सोमण, रमेश वरखेडे, प्रभाकर जोशी-चारुता गोखले, द० दि० पुंडे, चं० द० इंदापूरकर, विजय इंगळे या सर्वांच्या नंतर अगदी शेवटी डॉ० केळकरांचे नाव येते! यावरून लेखिकेच्या नीरक्षीरविवेकबुद्धीची आणि भाषाविज्ञानाबद्दल तिला असलेल्या आस्थेची कल्पना येते!





अनुक्रमणिका

येथे मला डॉ० केळकरांनी ''भाषा आणि जीवन''मध्ये लिहिलेल्या एका लेखाची आठवण येते. त्यात त्यांनी डेक्कन कॉलेज या आधुनिक भाषाविज्ञानाची पंढरी असलेल्या संस्थेबद्दल म्हटले होते, ''ज्या मराठी मातीत हे भाषाविज्ञान केंद्र उभारले गेले त्याच्याकडे मराठी भाषक विद्यार्थी, अध्यापक आणि पालक यांनी पाठ फिरवली. डेक्कन कॉलेजमध्ये या विषयाची गंगा वाहिली. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंतचे तरुण, कॅनडापासून फिलिपाइन्सपर्यंतचे अभ्यासक तिच्यात सुस्नात झाले; पण महाराष्ट्र कोरडाच राहिला.''

भाषाविज्ञानाच्या अभ्यासाने भाषेबद्दलचा शास्त्रीय दृष्टिकोन तयार होतो, स्वभाषेबद्दलचा दुरभिमान आणि अन्य भाषांबद्दलचे चुकीचे ग्रह कमी होतात, शिक्षणातील एक विषय आणि शिक्षणाचे माध्यम या भाषेच्या दोन भूमिकांमधील फरक उमगतो, भाषेचे संशोधन म्हणजे काय, त्याची किती आवश्यकता आहे आणि त्याला किती प्रचंड वाव आहे याची कल्पना येते, भाषेच्या विकासाचे कार्यक्रम काय असावेत आणि ते कसे आखावेत व पार पाडावेत, अशा अनेक गोष्टी कळू लागतात. पण मराठीने - म्हणजे मराठीच्या शिक्षणाच्या दोऱ्या ज्यांच्या हातात आहेत त्यांनी - म्हणजे शासनाने, विद्यापीठांच्या अभ्यास मंडळांनी, पाठ्यपुस्तक मंडळांनी आणि परिणामत: मराठीच्या अध्यापकांनी व विद्यार्थ्यांनी भाषाविज्ञानाकडे काणाडोळा केला, त्याला सापत्नभावाने वागवले. मराठीसाठी पुढील २५ वर्षांचे धोरण ठरवणे, मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळवून देणे असल्या विषयांसाठी समित्या 'गठित' करणे, (आणि त्यांत भाषाविज्ञानाचा अभ्यासक येणार नाही याची काळजी घेणे), नवनवीन पारितोषिकांच्या कल्पना राबवून त्यांचे वाटप करणे यांतच शासन धन्यता मानते आणि मराठीसाठी आपण भरघोस कार्य करीत आहोत असे समाधान मानते!

'भाषा आणि जीवन'ने यापूर्वी (वर्ष २५ : २००७) आपल्या रौप्यमहोत्सवी वर्षांतील चार अंकांवर मोरो केशव दामले, पाणिनी, अॅव्हरम नोअम चॉम्स्की व फेर्दिनां द सोस्यूर या भाषाभ्यासकांना स्थान दिले होते. यापुढेही आणखीही भाषावैज्ञानिकांच्या कार्याचे स्मरण व परिचय करून देण्याचा आमचा विचार आहे.

**- प्र० ना० परांजपे**





अनुक्रमणिका

# सुनीतिकुमार चटर्जी : भारतीय भाषाविज्ञानाचे प्रणेते

- रमेश धोंगडे

भारतातल्या भाषाविज्ञानातील पहिल्या फळीतील अभ्यासकांतील महत्त्वाचे नाव म्हणजे सुनीतिकुमार चटर्जी हे आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात युरोपात ऐतिहासिक भाषाविज्ञान उदयास येऊन बहरले. त्यातही ग्रीक-लॅटिन-संस्कृत-अवेस्ता यांची तुलना, अरेबिक-हीब्रू-सिरिॲक यांची तुलना आणि पहलवी (किंवा पझांद)-पुश्तो यांची तुलना त्या भाषांतील नैसर्गिक साधर्म्यांमुळे सुरू झाली. या तीन भाषासमूहांच्या अभ्यासातून तौलनिक भाषाविज्ञान हा ऐतिहासिक भाषाविज्ञानाचा महत्त्वाचा भाग विकसित झाला. भारतीय विद्यार्थ्यांना त्यात सामावून घेण्यात येण्यामागे दोन कारणे होती. एक - त्यांचे संस्कृतचे ज्ञान आणि दोन - त्यांचे इंग्रजीचे ज्ञान. ब्रिटिशपूर्व काळातील संस्कृत अध्ययनाची परंपरा ब्रिटिश शिक्षण पद्धतीमध्ये बदलत्या स्वरूपात चालू राहिली आणि तीमध्ये इंग्रजी अध्ययनाची भर पडली. महाराष्ट्रातील कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री चिपळोणकर, रानडे, नामदार गोखले, लोकमान्य टिळक, आंबेडकर, विनोबा भावे, लक्ष्मणशास्त्री जोशी वगैरे विद्वानांचा विचार केला तर संस्कृतचे पारंपरिक ज्ञान आणि इंग्रजी अध्ययनातून आलेली पाश्चात्त्य दृष्टी यांचा परिणाम स्पष्टपणे दिसेल.

सुनीतिकुमार यांचा जन्म हावरा प्रांतातील शिबपूर या गावी २६ नोव्हेंबर १८९० ला झाला. त्यांचे शालेय शिक्षण व पुढचे उच्च शिक्षण कोलकत्यात झाले. कोलकत्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमधून १९११ मध्ये ते बी०ए० ऑनर्स प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले व १९१३मध्ये इंग्रजी वाङ्मयात एम०ए०ला पहिले आले. लगेचच विद्यासागर कॉलेजमध्ये ते इंग्रजीचे प्राध्यापक झाले व १९१४ मध्ये कोलकता विद्यापीठातील इंग्रजी विभागात प्राध्यापक झाले. १९१९



मध्ये युरोपिअन भाषाविज्ञानाचा अभ्यास करण्यासाठी त्यांना केंद्र सरकारची शिष्यवृत्ती मिळून ते इंग्लंडला गेले. युनिव्हर्सिटी ऑफ लंडनमध्ये त्यांनी स्वनविज्ञानात पदविका मिळविली आणि १९२१ मध्ये भारतीय-आर्य भाषांच्या तौलनिक अभ्यासासाठी त्यांनी डी०लिट० मिळविली.

लंडनमध्ये डॅनिअल जोन्सच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी स्वनविज्ञानाचा अभ्यास केला तर थॉमस आणि बार्नेट यांच्या मार्गदर्शनाखाली अनुक्रमे भारतीय-युरोपिअन भाषाकुल व भारतीय-आर्य भाषाकुल यांचा अभ्यास केला. पर्शिअन आणि गॉथिक या भाषांचा अभ्यासही त्यांनी लंडनला केला. १९२१ ते १९२२मध्ये ते पॅरिस येथे होते. पॅरिसला ज्यूल्झ् ब्लोक यांच्याकडे ते भाषाविज्ञान शिकले. ब्लोक हे द्रविडी भाषांचे तज्ज्ञ होते. याच गृहस्थांनी १९२६ मध्ये 'ला फॉर्मेशिन द ला लांग मराठी'[१] हा मराठीची भाषावैज्ञानिक चिकित्सा करणारा ग्रंथ लिहिला. ब्लोक मराठीमधील द्राविडी भाषांच्या - विशेषत: कन्नडच्या - खाणाखुणा शोधतात (अर्थात मराठीचे थेट मूळच द्राविडी भाषात शोधण्याचा अचाट प्रयत्न करीत नाहीत!) भाषाविज्ञानात दोन भाषांच्या संसरणाचा अभ्यास करणारा एक गट आहे. (संपर्कातून संसरण संभवते याचा अर्थ एखादी भाषा दुसऱ्या भाषेत पूर्ण विलीन होते असा नाही.) ब्लोक मराठीची ध्वनिव्यवस्था, रूपिमव्यवस्था व काही प्रमाणात वाक्यव्यवस्था द्राविड भाषांच्या चष्म्यातून पाहतात. (पुढे साऊथवर्थने मराठीला पिजिन ठरविण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. जेम्स गेअर म्हणतात त्यानुसार मराठीची रूपिमव्यवस्था पाहिली तर ती पिजिन असणे शक्य नाही, हे कुणाही भाषावैज्ञानिकाला पटावे.) भारतीय-आर्य भाषांसाठी अन्तोनी मेलेट तर भारतीय-युरोपिअन भाषांसाठी पॉल ऐलिएट यांचे मार्गदर्शन सुनीतिकुमारांना लाभले. १९२२मध्ये भारतात परत येताच त्यांना कोलकता विद्यापीठात खैरा प्रोफेसर ऑफ इंडियन लिंग्विस्टिक्स् या अधिष्ठानाची प्राध्यापकी मिळाली. येथेच तारापोरवालांकडे त्यांनी अवेस्ताचा अभ्यास केला.

१९२६ मध्ये 'दि ऑरिजिन ॲण्ड डेव्हलपमेंट ऑफ द बंगाली लँग्विज्' हा सुनीतिकुमारांचा ग्रंथ दोन खंडांमध्ये प्रसिद्ध झाला. १९२८ मध्ये 'अ बंगाली फनेटिक रीडर' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. यांतील बंगाली भाषेवरचा ग्रंथ लिहिताना त्यांनी विसाव्या शतकापासूनच्या बंगाली शब्दकोशांचा अभ्यास केला. सुनीतिकुमार आणि पुढे त्यांचेच विद्यार्थी सुकुमार सेन यांच्या मते दहाव्या शतकातील मागधी प्राकृतातून बंगाली उदयास आली. सुनीतिकुमारांनी बंगाली शब्दांच्या व्युत्पत्तींचे विश्लेषण केले आहे. संस्कृत

---

१. डॉ० वासुदेव परांजपे यांनी मित्रऋण फेडण्यासाठी त्याचे मराठीत भाषांतर केले आणि १९४४मध्ये ते स्वत:च प्रकाशित केले. - संपादक

---





अनुक्रमणिका

शब्दांपासून बनलेले म्हणजे तद्भव शब्दांचे बंगालीतील प्रमाण ५०% आहे; तर संस्कृतप्रमाणेच रूप असणारे म्हणजे तत्सम शब्दांचे प्रमाण ४५% आहे. फक्त पाच टक्के शब्द पर्शियनसारख्या इतर भाषांतून बंगालीत आले आहेत. (मोल्सवर्थचा मराठी-इंग्जी शब्दकोश १८३१चा. त्यातील अरेबिक शब्दांचे मराठीतील प्रमाण, तसेच पर्शियन शब्दांचे मराठीतील प्रमाण नक्कीच इतके कमी नाही. उदाहरणार्थ, सहज म्हणून उघडलेल्या ४८९ पृष्ठावर 'पंधरवडा' ते 'पारडे' असे सुमारे ८० शब्द आहेत. यात 'पन्हा', 'पन्हेर'पासून तो 'परगणा'पर्यंत नऊ शब्द पर्शियन आहोत. म्हणजे हे प्रमाण ११% एवढे जाते. शब्द-व्युत्पत्तींच्या आधारे मुहंमद शाहीदुल्ला हे बंगाली भाषा सातव्या शतकातील गौडी भाषेतून उद्‌भवली असे मत मांडतात. तौलनिक भाषाविज्ञानाच्या मर्यादांची यातून जाणीव व्हावी.)

सुनीतिकुमारांच्या बंगाली भाषेवरील पुस्तकात तत्कालीन भाषाविज्ञानाच्या अवस्थेचे प्रतिबिंब दिसते. तौलनिक भाषाविज्ञानातील त्यांचे सुरुवातीचे अध्ययन बंगालीच्या विशेषत: बंगाली स्वन-व्यवस्थेच्या विश्लेषणातून दिसते. स्वर, व्यंजने यांमध्ये होत गेलेला कालसापेक्ष बदल ते दाखवतात. मागधी प्राकृत ते बंगाली असा हा स्वनप्रवास आहे. याचाच परिणाम म्हणून की काय सुनीतिकुमारांच्या प्रभावाखाली आलेल्या काही भारतीय भाषावैज्ञानिकांनी तसाच प्रयत्न केलेला दिसतो. एस०एम० कत्रे यांचे 'फॉर्मेशन ऑफ कोकणी' हे पुस्तक घ्या. शब्दांची, त्यांच्यातील ध्वनिपरिवर्तनाची कालसापेक्ष नोंद घेत कत्रे त्यांची बोली देतात. पण बोलीबोलीतील ध्वनींचे कालनिरपेक्ष विश्लेषण ते करत नाहीत. ककालींचे 'आसमीज्', यू०एन० तिवारींचे 'ऑरिजिन ॲण्ड डिव्हलपमेंट ऑफ भोजपुरी', महादेवशास्त्रींचे 'हिस्टॉरिकल ग्रामर ऑफ तेलुगु' ही पुस्तकेही सुनीतिकुमारांच्या बंगालीवरच्या ग्रंथाच्या प्रभावाखाली तयार झालेली आहेत.

ध्वनिशास्त्राच्या आधारे स्वभाषेतील ध्वनींचे वर्णन करणे, ते ध्वनी ज्या शब्दांत आहेत त्यांचा कालसापेक्ष इतिहास मांडणे, ध्वनींचे झालेले ऐतिहासिक परिवर्तन देणे, शक्य तेथे भारतीय-युरोपिअन व भारतीय-आर्य भाषांतील प्रमुख ध्वनिवैशिष्ट्यांचा स्वभाषेच्या संदर्भात उल्लेख करणे, प्राणस्फोटन, निष्प्राणस्फोटन, सघोषीभवन, अघोषीभवन. स्वरसादृश्य, सदृशीकरण, विसदृशीकरण, द्वित्व, स्वनागम, लोप वगैरे स्वनव्यवस्थेतील प्रक्रियांचा निर्देश करणे हे स्वनव्यवस्थेमध्ये प्रामुख्याने येते. यातही ऐतिहासिक भाषाविज्ञानावर भर अधिक. उदाहरणार्थ, पराखंडकीय वैशिष्ट्ये ही कालनिरपेक्ष ध्वनिव्यवस्थेत येत असल्यामुळे आणि प्रत्यक्ष भाषितांचा संग्रह, त्यांचे विश्लेषण वगैरे गोष्टी न केल्यामुळे त्यांचा विचार अत्यल्प होतो.

सुनीतिकुमारांनी संरचनावादी भाषाविज्ञान - खरे म्हणजे वर्णनात्मक भाषाविज्ञान - आणि तौलनिक भाषाविज्ञान यांची सांगड आपल्या बंगालीवरच्या ग्रंथामध्ये घातली





अनुक्रमणिका

असे म्हटले जाते. अमेरिकन वर्णनात्मक भाषाविज्ञान विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात पुढे येत होते. सस्यूरपेक्षा पाइक, नायडा, हॅरिस यांचा प्रभाव वाढत होता, त्याचा हा परिणाम दिसतो. सुनीतिकुमार देखील रूपिम व्यवस्थेचा वर्णनात्मक पद्धतीने विस्ताराने विचार करतात. पण वाक्यव्यवस्थेचा विचार वर्णनात्मक भाषाविज्ञानातच तुटपुंजा असल्याने बंगालीच्या वाक्यव्यवस्थेचा फार खोलवर जाऊन विचार झालेला दिसत नाही.

सुनीतिकुमार चटर्जींचे निधन १९७७ साली म्हणजे वयाच्या ८७व्या वर्षी झाले. म्हणजे जनकसूत्री भाषाविज्ञानास सुरुवात होऊन वीस वर्षे झाली होती. चॉम्स्कीचे 'आस्पेक्ट्स' १९६५मधले. पण या भाषाविज्ञानाचा फारसा परिणाम सुनीतिकुमारांच्या लेखनावर झालेला दिसत नाही. १९२६ नंतर त्यांनी अनेक गोष्टींमध्ये सक्रिय भाग घेतला. शैक्षणिक वर्तुळातील अनेक मानाची स्थाने व पदे त्यांना मिळाली. उदाहरणार्थ, १९३५ मध्ये कोलकता विद्यापीठाचे प्रतिनिधी म्हणून लंडन, हंगेरी, झेकोस्लाव्हेकिया, जर्मनी व फ्रान्स येथे ते गेले. १९३८ मध्ये ते मानववंशशास्त्रज्ञ परिषदेला कोपनहेगन व पौवार्त्यविद्या परिषदेसाठी डेन्मार्क, स्वीडन, फिनलंड, इटली, पोलंड येथे जाऊन आले. १९४८ मध्ये ते पुन्हा आंतरराष्ट्रीय भाषाविज्ञान परिषद व मानववंशशास्त्र परिषद यांवर भारताचे प्रतिनिधी म्हणून पॅरिस व ब्रसेल्सला गेले. युनेस्को परिषदेसाठी १९५० व १९५१ मध्ये इटली, इंग्लंड, तुर्कस्तान व हॉलंडला गेले. १९५२ मध्ये पेन्सिल्व्हानियाला ते अतिथी प्राध्यापक म्हणून गेले. १९५४ मध्ये इंडियन कौन्सिल फॉर कल्चरल रिलेशन्सतर्फे ते पश्चिम आफ्रिका, इजिप्त, लिबिया, नायजेरिया येथे गेले. भारतीय विद्यापीठांचे प्रतिनिधी म्हणून १९५५ मध्ये ते चीनला गेले. पॅरिसमधील 'सोसायटी एशियॅटिक', अमेरिकन 'ओरिएन्टल सोसायटी' यांचे ते सदस्य होते. १९५२ मध्ये बंगाल विधान-परिषदेवर ते अपक्ष म्हणून निवडले गेले आणि परिषदेचे अध्यक्ष बनले. १९५३ मध्ये ते कोलकत्याच्या एशियाटिक सोसायटीचे अध्यक्ष झाले. अनेक नामवंत संस्थांचे ते सदस्य होते. १९५४ मध्ये त्यांनी रॉकफेलर फौंडेशनतर्फे पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये भाषाविज्ञानाचे हिवाळी वर्ग घेतले. १९५५ मध्ये त्यांना पद्मभूषण हा मानाचा किताब देण्यात आला. कोलकत्याहून लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडियाचे ऑफिस पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये आणून 'इंडियन लिंग्विस्टिक्स' ही संशोधन-पत्रिका सुरू करण्यात सुनीतिकुमारांचा मोठा वाटा आहे.

■

स्थिरभाष : 020-2523 0816
चलभाष : 9561640857





अनुक्रमणिका

# बोधात्मक अर्थविज्ञान, संकल्पनानिर्मिती व भाषिक प्रकटीकरण

- अरविंद जाधव

## ( १ ) विषयप्रवेश

सदर लेखात संकल्पनांचे स्वरूप, संकल्पनानिर्मिती व संकल्पनांचे भाषिक प्रकटीकरण याबाबत टाल्मीने मांडलेल्या सिद्धांताचे विवेचन केले आहे. बोधात्मक अर्थविज्ञान या शाखेच्या निर्मितीतील लिओनार्द टाल्मीचे योगदान पायाभूत व सर्वाधिक आहे. तो या शाखेचा जनक आहे, त्यामुळे त्याच्याव्यतिरिक्त या शाखेचा विचार निरर्थक ठरतो. बोधात्मक अर्थविज्ञान ही बोधात्मक भाषाविज्ञानाची शाखा असून दोन्ही शाखांना संपूर्णत: वेगळे करता येत नाही. त्यामुळे लेखात दोहोंची अपरिहार्य चर्चा असली तरी बोधात्मक अर्थविज्ञानावर अधिक भर दिला आहे. टाल्मीबरोबरच, लेकॉफ, लँगॅकर, फोकोनी इत्यादींचे बोधात्मक अर्थविज्ञानातील कार्यही महत्त्वाचे आहे. मात्र लेखात या सर्वांच्या विचारांची सखोल चर्चा न करता प्रामुख्याने टाल्मीचे संशोधन विचारात घेतले आहे. ही चर्चा व्यक्तिकेंद्रित नसून विचारकेंद्रित आहे व त्यामध्ये टाल्मीने १९७२ ते २०१६ या काळात केलेल्या संशोधनाचा संबंध आहे, हे संशोधन आजही सुरूच आहे.

## ( २ ) बोधात्मक अर्थविज्ञानाचे स्वरूप

बोधात्मक अर्थविज्ञान ही बोधात्मक भाषाविज्ञानाची एक सैद्धांतिक शाखा आहे. या शाखेत भाषेचा आकलनाच्या दृष्टीने अभ्यास केला जातो. संवेदना, अवधान, नियंत्रण, निर्णयक्षमता, स्मृती, इ० बोधात्मक संरचनेप्रमाणेच भाषा ही सुद्धा अशीच एक बोधात्मक संरचना आहे. उपरोक्त बोधात्मक संरचनांचा भाषेवर परिणाम होत असतो तसेच भाषेचा परिणाम हा वरील संरचनांवर होत असतो. वर नमूद केलेल्या व इतर विविध संरचनांची मिळून मानवाची समग्र बोधात्मक संरचना-प्रणाली बनलेली असते. बोधात्मक भाषाविज्ञान अर्थास केंद्रीभूत मानून कार्य करीत असल्याने बोधात्मक भाषाविज्ञान व बोधात्मक अर्थविज्ञान यामध्ये बरेच साम्य आहे. या लेखात टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानविषयक विचारांची चर्चा केलेली आहे. प्रथम बोधात्मक भाषाविज्ञानातील बांधिलकी तत्त्वे व भाषेच्या विविध स्तरांत कार्यरत असलेली काही सामायिक तत्त्वे यांचा उल्लेख केला आहे. त्यानंतर बोधात्मक अर्थविज्ञानाच्या मार्गदर्शक तत्त्वांचा समावेश आहे. त्यानंतर या शाखेतील प्रमुख संकल्पना, अर्थनिर्मितीप्रक्रिया व त्यांस कारणीभूत घटकांची चर्चा येते.





अनुक्रमणिका

## ( ३ ) बोधात्मक भाषाविज्ञानाची बांधिलकी-तत्त्वे

बोधात्मक भाषाविज्ञानात दोन बांधिलकी-तत्त्वे पाळली जातात : सामान्यीकरण-बांधिलकी व बोधात्मक-बांधिलकी (लेकॉफ १९९०). इवान्स् आणि ग्रीन (२००६, पृ० २७-२८) यांनीही बांधिलकी तत्त्वे व भाषेतील विविध स्तरांना जोडणारी सामायिक तत्त्वे पुढीलप्रमाणे विशद केली आहेत.

बोधात्मक भाषाविज्ञानाच्या सामान्यीकरण-बांधिलकीच्या एक गृहितकानुसार भाषेच्या विविध घटकांना जोडणारी काही सामायिक तत्त्वे असावीत आणि अशी तत्त्वे शोधणे हे भाषाविज्ञानाचे एक प्रमुख कार्य आहे. भाषेच्या रूपलक्षी अभ्यास-पद्धतीनुसार, विशेषत: चॉम्स्कीच्या जनकसूत्री व्याकरण पद्धतीनुसार, ध्वनिविचार, शब्दविचार, वाक्यविचार व अर्थविचार हे पूर्णत: भिन्न विभाग (स्तर) असून त्यांचे कार्य वेगवेगळ्या पद्धतीने चालते. बोधात्मक भाषावैज्ञानिकांच्या मते भाषाभ्यासाच्या सोयीसाठी आपण ध्वनिविचार, शब्दविचार, वाक्यविचार व अर्थविचार अशा संज्ञा वापरणे गैर नाही. मात्र ते स्वतंत्र विभाग असून त्यांचे कार्य वेगवेगळ्या पद्धतीने चालते हे त्यांना मान्य नाही. याउलट त्यांच्या मते या सर्व विभागांचे कार्य एकत्रित चालते. उदा० वर्गीकरण, विविधार्थिता व रूपक या तिन्ही तत्त्वांनुसार भाषेचे कार्य हे समग्र आकलनाचा भाग असल्याचे स्पष्ट होते.

**वर्गीकरण** (कॅटॅगरायझेशन) या तत्त्वानुसार वर्गीकृत घटकांतील सीमा या अस्पष्ट असतात, त्या 'हो-नाही'सारख्या टोकाच्या किंवा सुस्पष्ट नसतात. उदा० 'कप' या संकल्पनेत कमीअधिक उंचीचे, रंगाचे व आकाराचे विविध धातूचे, काचेचे व प्लॅस्टिकचे कितीतरी प्रकारचे कप समाविष्ट असतात. मात्र सर्वच संकल्पना या कपाच्या केंद्रीय (प्रोटोटाइप) संकल्पनेभोवती कमीअधिक अंतराने पण संलग्न अशा असतात. या वर्गीकरणाचा सखोल अभ्यास मनोवैज्ञानिक रॉश (१९७७) यांनी मांडला. त्यानंतर भाषाशास्त्रीय वर्गीकरणाच्या दृष्टिकोनातून टेलर (२००३) यांनी याचा विचार केला.

**विविधार्थिता** (पॉलिसेमि) या तत्त्वानुसार एकच भाषिक घटक भिन्न भिन्न अर्थ दर्शवितो. मात्र ते भिन्न एकमेकांशी संलग्न असतात. बोधात्मक भाषाविज्ञानाच्या मते विविधार्थिता हे तत्त्व फक्त शब्दरचनेशी संबंधित नसून ते भाषेच्या विविध स्तरांवर कार्यरत असते. विविधार्थितेचा बोधात्मक अर्थविज्ञानाच्या दृष्टिकोनातून विविध भाषांमध्ये अभ्यास केला आहे. त्यामध्ये टायलर आणि इवान्स् (२००३) यांनी केलेला इंग्रजीच्या शब्दयोगी अव्ययांचा अभ्यास हे वानगीदाखल उदाहरण देता येईल.

**रूपक** (मेटॅफर) हेसुद्धा मानवी भाषेचे महत्त्वपूर्ण तत्त्व आहे. भाषेत एक संकल्पना दुसऱ्या संकल्पनेच्या आधारे पद्धतशीरपणे व्यक्त केली जाते. अर्थविस्तारीकरण हे

रूपकाचे प्रमुख अंग आहे. रूपकतत्त्व भाषेतील विशिष्ट विभागाच्या मर्यादेबाहेरही कार्य करते. लेकॉफ रूपकाची रचना व दैनंदिन जीवनातील महत्त्व विशद करतो. रूपकाकडे फक्त अलंकारित दृष्टिकोनातून न पाहता त्याचे मानवी विचारप्रक्रियेतील पायाभूत स्थान लेकॉफ साहित्याच्या (लेकॉफ : १९८७) व मानवी मेंदूविज्ञानाच्या अभ्यासाद्वारे सिद्ध करतो (लेकॉफ : २०१३).

संक्षेपात असे नमूद करता येईल, की भाषेची वर्गीकरण, विविधार्थिता, रूपक इ० पायाभूत तत्त्वे भाषेच्या विविध विभागांत भूमिका बजावतात. अशा प्रकारे सामान्यपणे भाषेचा अभ्यास एकत्रित करणे इष्ट ठरते. त्याचे विविध विभाग करून ते एकमेकांपासून अगदीच भिन्न असल्याचे मानणे गैर होईल. प्रचलित अशी आशयात्मक व्यवस्था (खुला शब्दवर्ग) व व्याकरणात्मक व्यवस्था (मर्यादित शब्दवर्ग) यांचे एकत्रीकरण करण्यात बोधात्मक भाषाविज्ञानाचे पहिले बांधिलकी-तत्त्व - सामान्यीकरण - बऱ्याच अंशी यशस्वी झाले.

बोधात्मक भाषाविज्ञानाच्या दुसऱ्या बांधिलकी-तत्त्वानुसार बोधविज्ञानाच्या इतर अभ्यासशाखांतून मांडलेल्या मानवी बोधासंबंधी सामान्य बाबी भाषेच्या रचनांतूनही व्यक्त होतात (भाषेसंबंधीच्या विशिष्ट बोधात्मक बाबी नव्हे). त्याचबरोबर बोधात्मक भाषाविज्ञान मनाची विभागणी (मॉड्युलर) पद्धती नाकारते. भाषाविज्ञानाच्या रूपलक्षी अभ्यासपद्धतीनुसार, भाषेसाठी स्वतंत्र विभाग असून त्याचे कार्य इतर आकलनापेक्षा भिन्न स्वरूपाचे असते.

या संदर्भात बोधविज्ञानात (कॉग्निटीव्ह सायन्स) अवधान (अटेन्शन) हे बोधात्मक तत्त्व अधिक स्पष्ट होते. उदा० मानसशास्त्रात नमूद केल्याप्रमाणे, आपण पाहिलेल्या कोणत्याही दृश्याचे दोन भागात वर्गीकरण होते : आकृती व पृष्ठभाग. दृश्यातील अधिक महत्त्वाच्या घटकासाठी आकृती ही संकल्पना वापरली जाते, तर इतर कमी महत्त्वाचा भाग पृष्ठभाग म्हणून कार्य करतो, ज्यामुळे आकृती अधिक स्पष्ट होते. भाषेतील प्रत्येक वाक्याचेही अवधानाच्या दृष्टीने दोन भागांत वर्गीकरण होते. वाक्यातील (ऐकणाऱ्याच्या दृष्टीने) महत्त्वाच्या भागावर अधिक लक्ष केंद्रित होते व कमी महत्त्वाच्या भागाकडे तो कमी प्रमाणात लक्ष देतो (दुर्लक्ष करतो असे नव्हे). केवल वाक्यात हा भाग वाक्याच्या सुरुवातीस येतो. उदा० '**राम** वनवासाला गेला' या वाक्यातील 'राम' हा आकृती (अधिक महत्त्वाचा) तर वनवास हा पृष्ठभाग (कमी महत्त्वाचा) ठरतो. भाषाविज्ञानात वाक्यातील अधिक महत्त्वाच्या घटकास सेलियन्स ही संज्ञा आहे. आपण वरील उदाहरणावरून पाहिले की अवधान-वितरण हे तत्त्व दृश्याचे आकलन करून घेताना दृश्यात्मक (व्हिजवल अटेंशन), तर भाषेतील वाक्याचे आकलन करून घेताना श्रवणात्मक (ऑडिटरी अटेंशन) अवधान कार्यरत असल्याचे आढळते.





अनुक्रमणिका

### ( ४ ) बोधात्मक अर्थविज्ञानाची मार्गदर्शक तत्त्वे

वरील दोन बांधिलकी तत्त्वांप्रमाणेच बोधात्मक अर्थविज्ञानाची काही मार्गदर्शक तत्त्वे आहेत. इवान्स् (२००७, पृ० ६) यांनी नमूद केल्याप्रमाणे बोधात्मक अर्थविज्ञानाची चार मार्गदर्शक तत्त्वे आहेत : (१) सांकल्पनिक रचना ह्या मानवी संवेदनात अंतर्भूत (एमबॉडिड) असतात. (२) आर्थिक रचना म्हणजेच सांकल्पनिक रचना होत, (३) अर्थाचे स्वरूप हे कोशात्मक (त्रोटक) नसून ज्ञानात्मक (अधिक संपन्न) असते, व (४) अर्थनिर्मिती म्हणजेच संकल्पनानिर्मिती होय.

### ( ५ ) टाल्मीचे बोधात्मक अर्थविज्ञानविषयक विचार

टाल्मीच्या मते, संकल्पनात्मक रचनेचे भाषिक प्रकटीकरण हे बोधात्मक भाषाविज्ञानाच्या अभ्यासाचा केंद्रीभूत घटक आहे. यामध्ये तो फोकोनी (१९८५), फोकोनी व टर्नर (२००२), फिलमोर (१९७५, १९७६), लेकॉफ (१९८७, १९९३), लँगॅकर (१९८७, १९९१), टाल्मी (२०००), आणि गिरार्टस् व कुखेन्स (संपा० २००७) इत्यादींच्या कार्याचा उल्लेख करतो. त्याच्या मते, भाषाविज्ञानाचा अभ्यास करणारे तीन दृष्टिकोन आहेत : रूपलक्षी, मानसिक व संकल्पनात्मक. बोधात्मक भाषाविज्ञान हे यांतील संकल्पनात्मक दृष्टिकोनाने भाषेचा अभ्यास करते; तसेच भाषेचे रूपलक्षी व मानसिक घटकही विचारात घेते.

रूपलक्षी दृष्टिकोन भाषेच्या वाक्यविचार व शब्दविचार या घटकांचा अभ्यास करतो, पण रूपलक्षी दृष्टिकोनाचा मानसिक व संकल्पनात्मक बाबींशी असलेला संबंध मर्यादित आहे. यामध्ये प्रामुख्याने व्याकरणिक रचनांचा आर्थिक रचनेशी असलेला संबंध तपासला जातो. त्या दृष्टीने पुष्कळसे चांगले कामही झाले आहे; पण भाषेच्या समग्र सांकल्पनिक व्यवस्थेबाबत हा दृष्टिकोन भाष्य करीत नाही; भाषिक रचनांचा अभ्यास करण्यासाठी जितका आवश्यक आहे, तेवढाच अर्थविचारातील भाग व मानसिक प्रक्रियांचा अभ्यास या दृष्टिकोनात समाविष्ट असतो.

मानसिक दृष्टिकोन भाषेकडे संवेदना, स्मृती, अवधान, व विचारप्रक्रिया या इतर बोधात्मक व्यवस्थेप्रमाणे पाहतो. यामध्ये सांकल्पनिक दृष्टीने आर्थिक स्मृती, संकल्पनांतील साधर्म्य, वर्गीकरणाची रचना, अनुमान, व संदर्भ यांसारख्या गोष्टींचा समावेश होतो. पण हा सुद्धा दृष्टिकोन भाषेची समग्र सांकल्पनिक संरचना, संकल्पनानिर्मिती व त्यांचे भाषेतील प्रकटीकरण याबाबत पुरेसा खुलासा करत नाही.

बोधात्मक भाषाविज्ञानाचा सांकल्पनिक दृष्टिकोन हा सांकल्पनिक ज्ञानाचे स्वरूप, त्याची रचना व प्रक्रिया आणि त्याचे भाषेच्या माध्यमातून होणारे प्रकटीकरण या घटकांचा अभ्यास करतो. यामध्ये मुख्यत्वे काळ व अवकाश, घटना व दृश्ये, वस्तू

व प्रक्रिया, स्थान व गती, आणि बल व कार्यकारणभाव यासारख्या अत्यंत पायाभूत अशा सांकल्पनिक घटकांचा अभ्यास केला जातो. याचप्रमाणे मानसिक प्रक्रियांवर प्रभाव टाकणाऱ्या घटकांत अवधान व दृष्टिकोन, इच्छा/संकल्प व हेतू/उद्देश आणि अपेक्षा व परिणाम इ० घटकांचा समावेश होतो. यामध्ये शब्दांची रूपे व वाक्यरचना यांच्या अर्थरचनांचाही अभ्यास केला जातो. तसेच यामध्ये अनुक्रमे रूपकात्मक रचना, आर्थिक चौकट, मजकूर व संदर्भ यांचा सांकल्पनिक रचनांशी असलेला संबंध याचा अभ्यास केला जातो. थोडक्यात, सांकल्पनिक रचनांच्या भाषेतील वैश्विक स्वरूपाचा अभ्यास हा बोधात्मक भाषाविज्ञानाच्या अभ्यासाचा प्रमुख उद्देश आहे.

बोधात्मक भाषावैज्ञानिकांच्या मते, भाषेने संघटित केलेला संकल्पनात्मक आशय म्हणजेच अर्थ होय. साधारणपणे मानवी विचारांमध्ये भाषिक अर्थ समाविष्ट असतो त्याचबरोबर भाषिक अर्थ मानवाच्या साधारण विचार संकल्पनेतील काही घटकांवर अवलंबून असतो.

रोनाल्ड लँगॅकर वाक्यातील प्रत्येक रूपिमाचा व रचनेचा एकूण वाक्याच्या अर्थास होणारा उपयोग पद्धतशीरपणे मांडतो, तर टाल्मी व लेकॉफ यांच्या मते वाक्यरचनेतील प्रत्येक घटकाशिवाय अशी काही तत्त्वे आहेत की ज्यांचा अर्थावर अधिक परिणाम होतो. त्याचप्रमाणे लेकॉफ एम्बॉडीमेंट थीसिस (मानवाचे दैनंदिन विविध प्रकारचे अनुभव, त्यास जाणवणाऱ्या विविध संवेदना, मानवास लाभलेली विशिष्ट शरीररचना व चेताव्यवस्था इत्यादींमुळे त्यांचे होणारे विशिष्ट आकलन) मांडतो की जो लँगॅकर व टाल्मी काही प्रमाणात विस्तारित प्रकारे मांडतात, तर काही प्रमाणात लेकॉफच्या सिद्धांताला विरोध करतात.

कार्यलक्षी भाषाविज्ञान अभ्यासपद्धतीच्या जवळ जाणाऱ्या बोधात्मक भाषाविज्ञानात वाक्यबंधाचा अभ्यास हा परिघावर असून कार्यलक्षी भाषाविज्ञानात तो केंद्रस्थानी असतो. जाकेनडॉफचा (१९९६) संकल्पनात्मक अर्थविज्ञान ही पद्धती बोधात्मक भाषाविज्ञानासारखी आहे, मात्र तो अर्थ स्पष्ट करताना गणितीय सूत्रपद्धती सोडत नाही. टाल्मीच्या मते, ही पद्धत मुख्यत्वे भाषिक अर्थछटा व अर्थबदल याबाबत कमी पडते. तसेच जाकेनडॉफच्या अवकाशीय रचनेपर्यंतचा अभ्यास बोधात्मक भाषाविज्ञान कालिक रचना, बल व कार्यकारणभाव, बोधात्मक स्थिती, सत्यता, इत्यादी बाबींसाठीही वापरते.

**व्याकरणव्यवस्थेचे अर्थविज्ञान** : टाल्मीच्या मते, भाषेच्या सार्वत्रिक वैशिष्ट्यानुसार अर्थ समाविष्ट असलेल्या घटकांचे दोन विभाग पडतात : **आशयात्मक शब्दव्यवस्था** (खुला गट) व **व्याकरणिक शब्दव्यवस्था** (मर्यादित गट). त्यांस खुला गट व मर्यादित गट असे संबोधण्याचे कारण म्हणजे खुल्या गटात मोठ्या

प्रमाणात शब्द समाविष्ट असतात, तसेच आणखीही शब्द सहजरीत्या समाविष्ट होऊ शकतात, तर मर्यादित गटातील शब्दांची संख्या खूपच मर्यादित असून त्यांत नवीन शब्द सहजी समाविष्ट होत नाहीत. टाल्मीच्या मतानुसार, खुल्या गटात प्रामुख्याने नाम, क्रियापद व विशेषणांच्या मूळ रूपांचा समावेश होतो, तर मर्यादित गटात विविध प्रत्यय, शब्दयोगी अव्यय, उभयान्वयी अव्यय इ० शब्दांबरोबरच शब्दक्रम, नाम वा कर्ता यांसारख्या संज्ञा इत्यादींचा समावेश होतो (टाल्मी १९८३ : पृ० २२-२४). तसेच खुला गट सांकल्पनिक आशय व्यक्त करतो, तर मर्यादित गट सांकल्पनिक संरचना व्यक्त करतो. विशिष्ट भाषेतील सांकल्पनिक संरचना-प्रणाली ही वैश्विक संरचना-प्रणालीचाच भाग असते.

**व्याकरणावरील अर्थाची मर्यादा** : वरील दोन गटापैकी खुल्या गटामार्फत जे विविध अर्थ व्यक्त होतात ते अमर्यादित असे असतात.

मर्यादित गटामार्फत ठरावीक प्रकारच्या गोष्टीच व्यक्त होतात. उदा० जगातील बहुतांशी भाषा मर्यादित गटाच्या घटकांमार्फत वचन व्यक्त करतात; पण जगात कोणतीही अशी भाषा नाही की जी मर्यादित गटाच्या घटकांमार्फत रंग व्यक्त करू शकेल. वचनातही मर्यादित गटाचे घटक एकवचन, द्विवचन किंवा अनेकवचन यांसारख्या गोष्टी व्यक्त करतात; पण सम, विषम, डझन किंवा मोजता येणाऱ्या अशा संकल्पना व्यक्त होत नाहीत.

**व्याकरणाचे वलनशीलता तत्त्व** : भाषेच्या अर्थनिर्मितीची तत्त्वे ही युक्लीडीयन पद्धतीची (काटेकोर अथवा अचूक अंतर, आकार, कोन, इ०) नसून ती वलनशील, लवचीक, साधारण व जवळ जाणारी असतात. ती आवाका अथवा आकार याबाबत तटस्थ असतात. उदा० **आत** हे शब्दयोगी अव्यय वाटी**त**, पेटी**त**, देशा**त**, जगा**त**, इत्यादी ठिकाणी वापरले जाईल. आपण अनुक्रमे वाटी, पेटी, देश व जग यांचा आकार लक्षात घेतल्यास याची प्रचिती येईल.

**व्याकरणाचे संकल्पनानिर्मिती तत्त्व** : खुला गट आशय व्यक्त करण्याचे कार्य करतो, तर मर्यादित गट संरचना वा संघटनात्मक कार्य करतो.

**आकृतिबंधीय (ढाच्यात्मक) रचना** : भाषेतील अर्थाच्या संकल्पना या आकृतीबंधात्मक असतात. भाषेतील एका रूपिमास आकृतिबंध असे संबोधतात. संकल्पनानिर्मितीस आकृतिबंधीय संरचना सर्वात जास्त महत्त्वाची असते. यामध्ये भौमितिक रचना, दृष्टिकोन, अवधान-वितरण इ०चा समावेश होतो.

**( १ ) भौमितिक रचना** : ही भाषेतील मर्यादित गटाचे आकृतिबंध हे काळ, अवकाश किंवा इतर सांकल्पनिक रचना या भौमितिक पद्धतीने प्रकट करतात. उदा० अवकाशीय शब्दयोगी, कालिक उभयान्वयी, कालिक प्रत्यय इ०चा समावेश होतो. टाल्मीने

वापरलेली ही नवीन संकल्पना पूर्वीच्या एकवचन, द्विवचन, अनेकवचन इ० गोष्टींसाठी अधिक योग्य आहे. त्याच्या मते एकत्व (युनिप्लिसिटी) हे खुल्या गटामार्फत दर्शविले जाते, तर त्याचे अनेकत्व (मल्टीप्लिसिटी) भाषेचा मर्यादित गट दर्शवितो. ही संकल्पना वस्तूंच्या, गोष्टींच्या, व्यक्तींच्या बरोबरच क्रिया, प्रक्रिया, घटना इ० बाबतही लागू होते. उदा० वीज चमकली, विजा चमकल्या, विजा चमकत राहिल्या, विजा दोन तास चमकत (राहिल्या) होत्या इ० मध्ये **वीज** हे एकत्व दाखविते तर **विजा** अनेकत्व, त्याचप्रमाणे **चमकणे** एकत्व दाखविते, तर **चमकत राहणे** अनेकत्व. अनेकत्वातून एकत्व किंवा एकत्वाचे अनेकत्व करणे हे बोधात्मक (मानसिक) प्रक्रियेद्वारे केले जाते.

बोधात्मक घटकानुसार एखादी वस्तू विशिष्ट (खऱ्या व काल्पनिक) सीमांनी बद्ध आहे किंवा नाही यावर त्याचे बोधन अवलंबून असते. यामध्ये दोन घटक आहेत : सीमायुक्त व सीमामुक्त वस्तू. उदा० तळं हे सीमायुक्त आहे; तर पाणी हे सीमामुक्त आहे.

( २ ) **दृष्टिकोन** : बोलणाऱ्या वा ऐकणाऱ्या व्यक्तीच्या अस्तित्वाचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण (व्हॅन्टेज पॉइन्ट), अंतर, दिशा, इ० बाबी भाषेतील अवकाशीय व कालिक रचना समजावून घेताना आवश्यक आहेत (टाल्मी २०००). उदा० '**दरवाजा** उघडून दोन लोक **घरात** आले' या वाक्याचा बोध करून घेताना हे लक्षात येईल की व्यक्तीचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण घराच्या आत असेल. तर '**दोन लोक** दरवाजा उघडून **घरात** गेले' या वाक्याचा बोध करून घेताना हे लक्षात येईल की व्यक्तीचे वास्तविक वा काल्पनिक ठिकाण  घराच्या दरवाज्याच्या बाहेर असेल. वाक्याचे व्याकरण पाहिल्यास दोन बाबी लक्षात येतील : (१) वाक्यात सर्वप्रथम येणारा भाग (दरवाजा की दोन लोक) : व्यक्तीचे अवधान अनुक्रमे पहिल्या वाक्यात प्रथम दरवाजाकडे जाईल व नंतर त्याला वा तिला दोन लोक दिसतील. दुसऱ्या वाक्यात व्यक्तीचे लक्ष प्रथम दोन लोकांच्याकडे जाईल व नंतर दरवाजा व घरातील आतील भागाकडे जाईल. (२) दुसरी बाब अशी की वाक्यात वापरलेले क्रियापद (आले वा गेले) : त्यावरूनही बोध होतो.

( ३ ) **अवधान-वितरण** : ऐकणाऱ्याचे अवधान बोलणाऱ्याच्या कोणत्या गोष्टीवर किती प्रमाणात वितरीत होते, याचा परिणाम त्या गोष्टीच्या ग्रहणावर अथवा बोधावर होतो (टाल्मी २०००, २००७). उदा० तुमचे अवधान वाचनावर अधिक प्रमाणात असेल तर तुम्हास वाचत असलेल्या गोष्टींचे आकलन अधिक होईल, पण त्याच वेळी तुमच्या मनात इतर काही विचार चालू असतील व त्यावर तुमचे अवधान अधिक प्रमाणात एकवटले असेल, तर तुम्ही वाचत असलेल्या गोष्टींचा तुम्हाला नीट बोध होणार नाही.





अनुक्रमणिका

(४) **बल-गति विज्ञान** : मानव हा पृथ्वीच्या सर्वसमावेशक गुरुत्वाकर्षण संकल्पनेचा वापर करीत असतो. विविध क्रिया-प्रतिक्रियांचा तो दैनंदिन जीवनात सतत अनुभव घेतो व त्याप्रमाणे त्याची कार्ये करीत असतो. या सर्व बाबींचा परिणाम त्याच्या विचारावर व भाषेवर होतो. बलगतिविज्ञानाच्या दृष्टीने टाल्मी दोन घटकांची रचना मांडतो : बल प्रविष्ट करणारा घटक (अ‍ॅगॉनिस्ट) व ज्यावर बल प्रविष्ट होते तो घटक (अ‍ॅन्टॅगॉनिस्ट). यांमध्ये एक घटक म्हणजे बल-प्रबलक हा दुसऱ्या घटकावर म्हणजे बल-विरोधकावर बल प्रविष्ट करतो. त्याचा परिणाम बल-विरोधकावर होतो किंवा तो प्रविष्ट बलास विरोध करतो. या विरोधामध्ये बल-विरोधक बल-प्रबलकापेक्षा प्रबळ असेल तर यशस्वी होतो, अन्यथा तो अयशस्वी होतो आणि पर्यायाने बल-प्रबलक यशस्वी होतो. भाषेतील अवकाशीय व कालिक संकल्पनांचा, रचनांचा, घटनांचा व परिणामांचा अभ्यास करताना या बाबींचा विचारही आवश्यक ठरतो (टाल्मी १९८८). उदा० (१) चेंडू थांबला. (२) मालकाने घोड्याला दिवसभर पळविले.

आपणास ज्ञातच आहे की न्यूटनच्या पहिल्या नियमानुसार अवकाशातील (आकाशातील नव्हे) कोणतीही चल वस्तू चल राहते, तर अचल वस्तू अचल राहते व अचल वस्तूचा वेगही समान राहतो. अवकाशातील कोणत्याही वस्तूचा नैसर्गिक कल एकतर चल (मोटीव्ह) राहण्याकडे असतो वा अचल (अ‍ॅट रेस्ट) राहण्याकडे असतो. पहिल्या वाक्यात चेंडूचा नैसर्गिक कल पळत राहण्याकडे आहे, पण काही अडथळ्यामुळे वा वाऱ्याच्या वेगामुळे तो थांबला. यामध्ये चेंडू हा घटक प्रबलक आहे, तर त्याच्या थांबण्यासाठी कारणीभूत असणारा घटक बल-विरोधक आहे. दुसऱ्या वाक्यात मालक हा प्रबलक आहे, तर घोडा हा विरोधक आहे. घोड्याचा नैसर्गिक कल अचल राहण्याकडे आहे, मात्र मालकाने अधिक बल प्रविष्ट केल्याने घोड्याला पळत राहावे लागले. बद्धता (बाउंडेडनेस) ही दिवसभर या शब्दाने व्यक्त झाली आहे.

(५) **आकृती-पृष्ठभाग व्यवस्था** : मानसशास्त्रातील अत्यंत महत्त्वाची संकल्पना टाल्मीने भाषेच्या रचना अभ्यासण्यासाठी वापरली. अवधानाच्या बाबतीत वर नमूद केल्याप्रमाणे व्यक्ती तिने पाहिलेल्या दृश्याची विभागणी **आकृती** व **पृष्ठभाग** या घटकांत करते. अनुक्रमे आकृती ही अधिक महत्त्वाच्या गोष्टीकरिता वापरली जाते, तर दृश्यातील इतर भागाकडे पृष्ठभाग म्हणून पाहिले जाते. टाल्मीने गेस्टाल्ट मनोविज्ञानातील या गोष्टींचा भाषेत कसा वापर होतो याचे सविस्तर विश्लेषण केले आहे (टाल्मी १९७२, १९७५, १९८३, २०००).

(६) **समारोप** : या लेखात मुख्यत: टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानाचे विश्लेषण केले आहे. मानवी संकल्पनांचे स्वरूप, रचना, घडण व संकल्पनांचे भाषेतील प्रकटीकरण यांबाबत सविस्तर मांडणी केली आहे. याचबरोबर भौमितिक रचना, दृष्टिकोन,

अवधान-वितरण, बल-गति विज्ञान आणि कार्यकारणभाव, व आकृति-पृष्ठभाग संकल्पना यांचे संकल्पनानिर्मितीतील स्थान विशद केले आहे.

टाल्मीच्या बोधात्मक अर्थविज्ञानाचा जगातील भाषांच्या (तुलनात्मक) अभ्यासासाठी वापर केला जात आहे. भारतातील भाषिक वैविध्य लक्षात घेता मराठी व अन्य भारतीय भाषांच्या संशोधनास (काळ व अवकाश, घटना व दृश्ये, वस्तू व प्रक्रिया, स्थान व गती, आणि बल व कार्यकारणभाव इ० घटकांच्या अनुषंगाने) टाल्मीचे बोधात्मक अर्थविज्ञान नक्कीच उपयुक्त ठरेल. ■

## संदर्भ


इवान्स, व्हिव्हियन आणि इतर (संपा०) २००७. *कॉग्निटिव्ह लिंग्विस्टिक्स रीडर*, लंडन : इक्विनॉक्स पब्लिशिंग.

इवान्स, व्हिव्हियन आणि मेलनी ग्रीन. २००६. *कॉग्निटिव्ह ग्रामर : ॲन इंट्रोडक्शन.* मॅसॅच्युसेट्स : एम.आय.टी. प्रेस.

गिरार्टस्, डिर्क आणि हर्बर्ट कुखेन्स. (संपा०) २००७. *दि ऑक्सफर्ड हँडबुक ऑफ कॉग्निटिव्ह लिंग्विस्टिक्स.* यु.के. : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

फिलमोर, चार्ल्स. १९७५. ॲन अल्टनेटिव्ह टु चेकलिस्ट थिअरीज ऑफ मीनिंग. *प्रोसिडिंग्ज ऑफ द फस्ट ॲन्युअल मीटिंग ऑफ बर्कले लिंग्विस्टिक्स सोसायटी.* पृ० १२३-१३१.

-----------. १९७६. फ्रेम सिमॅंटिक्स अँड नेचर ऑफ द लँग्विज. *ॲनल्ज ऑफ द न्यूयॉर्क ॲकॅडमी ऑफ सायन्सेस.* २८०. पृ० २०-३२.

फोकोनी, गायल्स. १९८५. *मेंटल स्पेसिस.* केंब्रीज : केंब्रीज युनिव्हर्सिटी प्रेस.

फोकोनी, गायल्स आणि मार्क टर्नर. २००२. द *वे वुइ थिंक : कॉन्सेप्च्युअल ब्लेंडींग अँड माइंड्स हिडन कॉम्प्लेक्सिटीज.* न्यूयॉर्क : बेसिक बुक्स.

लेकॉफ, जॉर्ज. १९८७. *वीमेन, फायर अँड डेंजरस थिंग्ज : वॉट कॅटेगरीज रिव्हील अबाउट द माइंड.* शिकागो : युनिव्हर्सिटी ऑफ शिकागो प्रेस.

---------- १९९०. द इन्व्हेरियन्स हायपोथिसिस : इज अब्स्ट्रॅक्ट रीझन बेस्ड ऑन इमेज स्कीमा? *कॉग्निटिव्ह लिंग्विस्टिक्स,* १(१). पृ० ३९-७४.

---------- १९९३. द कन्टेंपररी थिअरी ऑफ मेटॅफर, समाविष्ट : ए० ओर्टोनी (संपा०), *मेटॅफर अँड थॉट, द्वितीय आवृत्ती,* पृ० २०२-२५१. केंब्रीज : केंब्रीज युनिव्हर्सिटी प्रेस.

---------- २०१३. न्यूरल सोशल सायन्स, समाविष्ट : डेव्हीड फ्रॅक्स आणि जोनाथन टर्नर (संपा०), *हँडबुक ऑफ न्यूरोसोशोलॉजी.* पृ० ९-२५. नेदरलँडस: स्प्रींजर.

लँगॅकर, रोनाल्ड. १९८७. *फाउंडेशन्स ऑफ कॉग्निटिव्ह ग्रामर, प्रथम खंड.* स्टॅन्फर्ड : स्टॅन्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

----------- १९९१. *फाउंडेशन्स ऑफ कॉग्निटिव्ह ग्रामर, द्वितीय खंड.* स्टॅन्फर्ड: स्टॅन्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

रॉश, इलेनॉर. १९७७. ह्यूमन कॅटेगरायझेशन, समाविष्ट: एन० वॉरन (संपा०), *स्टडीज इन क्रॉसलिंग्विस्टिक सायकॉलॉजी.* पृ० १-४९. लंडन: ॲकॅडमिक प्रेस.

टायलर, अँड्रीया आणि व्हिव्हियन इवान्स. २००३. द *सिमँटिक्स ऑफ इंग्लिश प्रेपोझिशन्ज्: स्पेशियल सीन्ज, एम्बॉडिंग मीनिंग अँड कॉग्निशन.* केंब्रीज: केंब्रीज युनिव्हर्सिटी प्रेस.

टेलर, जॉन. २००३. *लिंग्विस्टिक कॅटेगरायझेशन.* यु.के.: ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस.

टाल्मी, लिओनार्द. १९७२. *सिमँटिक स्टक्चर्स इन इंग्लिश अँड अत्सुगेवी.* पीएच०डी० प्रबंध. बर्कले: युनिव्हर्सिटी ऑफ कॅलिफोर्निया प्रेस.

----------- १९७५. फिगर अँड ग्राउंड इन कॉम्प्लेक्स सेंटेंसिस समाविष्ट : *प्रोसिडिंग्ज ऑफ द फस्ट ॲन्युअल मीटिंग ऑफ बर्कले लिंग्विस्टीक्स सोसायटी.* पृ० ४१९-४३०.

----------- १९८३. हाउ लँग्विज स्ट्रक्चर्स स्पेस, समाविष्ट : हर्बर्ट पीक् आणि लिंडा अक्रेडोलो (संपा०) *स्पेशियन ओरिएंटेशन: थिअरी, रिसर्च अँड ॲप्लिकेशन.* पृ० २२५-२८२. न्यूयॉर्क: प्लिनम प्रेस.

----------- १९८८. फोर्स डायनॅमिक्स इन लँग्विज् अँड कॉग्निशन. *कॉग्निटिव्ह सायन्स, १२.*

----------- २०००. *टोअर्ड अ कॉग्निटिव्ह सिमँटिक्स, प्रथम खंड : कॉन्सेप्ट स्ट्रक्चरींग सिस्टम्स.* मॅसॅच्युसेट्स : एम.आय.टी. प्रेस.

----------- २००७. अटेंशन फिनोमेना. समाविष्ट: गिरार्ट्स्, डिर्क आणि हर्बर्ट कुखेन्स. (संपा०) २००७. द *ऑक्सफर्ड हँडबुक ऑफ कॉग्निटिव्ह लिंग्विस्टिक्स*. यु.के.: ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस. पृ० २६४-२९३.

जाकेनडॉफ, रे० १९९६. कॉन्सेप्च्युअल सिमँटिक्स अँड कॉग्निटिव्ह *लिंग्विस्टिक्स. कॉग्निटिव्ह लिंग्विस्टिक्स*, *७(१)*, ९३-१२९.

**ऋणनिर्देश**

(या लेखाच्या संपादनामध्ये डॉ० सोनल कुलकर्णी-जोशी व प्र०ना० परांजपे यांचे मार्गदर्शन लाभले. तसेच संभाजी जाधव यांनी या लेखाचे प्रथम वाचन करून काही मौलिक सूचना केल्या.)

चलभाष - 09881503087

ई-पत्ता : arvind.linguistics@gmail.com

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली, १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' या नियतकालिकाची मालकी व अन्य बाबींसंबंधी निवेदन :

(१) **प्रकाशन स्थळ :** बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411 051.

(२) **प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक : हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै), दिवाळी (ऑक्टोबर).

(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता** : आनन्द काटीकर, भारतीय, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद.

(४) **मुद्रणस्थळ** : भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(५) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता** : प्र० ना० परांजपे, एच्-१, क्लॅरियन पार्क, औंध टेलिफोन एक्स्चेंजजवळ, पुणे 411 067.

मी, आनन्द कार्टीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की वर दिलेला तपशील माझ्या माहिती व समजुतीप्रमाणे सत्य आहे.

**आनन्द काटीकर**

कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, प्रकाशक

# संत तुकारामांच्या अभंगांचा शैलीवैज्ञानिक अभ्यास : एक पुनरावलोकन

- दिलीप धोंडगे

१

तुकोबांच्या अभंगवाणीचा अभ्यास करण्यासाठी शैलीलक्ष्यी अभ्यासपद्धतीचे उपयोजन केले आहे. शैलीमीमांसा ही युरोपात विकसित झालेली अभ्यासपद्धती असल्यामुळे तिचा वापर कसा करायचा असा प्रश्न उपस्थित होणे शक्य आहे. ही पद्धती युरोपात विकसित झालेली असली तरी साहित्याची जी मूलभूत व सार्वत्रिक तत्त्वे आहेत, त्यांच्याशी ती संबंधित आहे. शैलीमीमांसा ही साहित्यकृतिकेंद्री अभ्यासपद्धती असल्यामुळे संबंधित साहित्यकृतीकडून तिला आवश्यक ती गमके मिळत असतात. साहित्यकृती ज्या परंपरेशी संबंधित असते, ती परंपरा व कलाकृती यांनी परंपरेशी संबंधित राहून पृथगात्म वैशिष्ट्ये टिकविली तर संबंधित परंपरेचे व्यापक कलात्मक स्वरूप वाङ्मयव्यवहारासंबंधी काही एक भान देते. साहित्यकृती ही भाषेच्या साहाय्याने साकार होते व भाषा या माध्यमाच्या मुखानेच बोलते, तेव्हा भाषेच्या अभ्यासाची तत्त्वेही सार्वत्रिक व त्या त्या भाषेच्या जडणघडण व वर्तनव्यवहाराशी पृथगात्मपणे संबंधित असतात. म्हणून भाषाविज्ञानातून मिळालेली तत्त्वे ही साहित्यकृतीच्या आविष्काराची पद्धत समजून घ्यायला उपयोगी पडतात. शैलीमीमांसा ही साहित्यकृतीची कलाकृती म्हणूनच दखल घेते. यामुळे कलाकृतीची जडणघडण ज्या तत्त्वांनी होते, ती तत्त्वे व कलाकृतीचा रूपांतर्गत पसारा याला महत्त्व प्राप्त होते. कलाकृतीतील आशयाचाच केवळ शोध घेण्याने अगदी प्रारंभीच कलाकृतीचे कलापण नाकारले जाते. कलाकृती आशयसंपन्नच असते; पण त्या आशयाची अभिव्यक्ती कलेच्या मुखाने होत असते. कलाकृतीचा अवघा देहच कलारूप असल्यामुळे ती अनेक मुखांनी बोलत असते. हे लक्षात घेतले नाही तर झाडाच्या नादात जंगलाचे भान सुटावे, तसे आशयाच्या नादात कलाकृतीच्या कलेच्या पसाऱ्याचे भान सुटते व तिच्या सौंदर्याची प्रतीती होणे अशक्य होते. आशयही सत्य व त्या आशयाला मंडित करणारा पसाराही सत्य ही कल्पना एक प्रकारे चिद्विलासवादीच आहे.

कुठल्याही श्रेष्ठ साहित्यकृतीचे नवनवीन दृष्टींनी अध्ययन होणे हे साहित्यनिर्मिती व साहित्यसमीक्षा या उभय व्यवहारांसाठी आवश्यक असते. संतसाहित्याच्या बीजभूत श्रेष्ठतेमुळे व कसदार विपुल निर्मितीमुळे नवीन अभ्यासपद्धतींची कसोटी संतसाहित्याचा

अभ्यास करण्यानेच लागू शकते, याची टीकाकारांना खात्री पटलेली आहे. तसेच संबंधित साहित्याचे नित्यनूतनत्व प्रकट करण्याची क्षमता लक्षात यावी यासाठी नवीन अभ्यासपद्धतीच अभ्यासकांना जुन्या अभ्यासपद्धतींच्या कचाट्यातून मुक्त करीत असतात. शेक्स्पीयरच्या संदर्भात लिहिताना टी०एस्० एलियट (१९४४) यांनी म्हटले आहे की, "दरम्यान, वाचक असे विचारू शकतो की, स्वत: शेक्स्पीयर आपल्या नाटकांतील ज्या गोष्टींबद्दल सजग नव्हता त्याबद्दल मी का सजग असावे? समकालीनांनी नाटकाचा जसा आस्वाद घेतला तसा मी का घेऊ नये? त्याचे उत्तर असे की आपण नव्या समीक्षेशिवाय जुन्या समीक्षेतून मुक्त होऊ शकत नाही.."[१] संतसाहित्याच्या अभ्यासाबाबतही हेच म्हणता येईल. शैलीमीमांसेसाठी भाषाविज्ञानाची मदत होते; पण मूल्यमापनात त्याचा सहभाग नसतो. भाषाविज्ञान समीक्षेच्या स्तरावर कार्य करीत नाही तर मूल्यपातळीवर जाणवलेल्या व्यवस्थापूर्व प्रतिसादांचे भाषावैज्ञानिक विश्लेषण करून मूल्यमापनासाठी ते आधारभूमी तयार करून देते. मूल्यमापन, मूल्यात्मकता हे समीक्षेचे स्तर आहेत. शैलीमीमांसा या स्तरांमध्ये येते.

२

तुकोबांच्या अभंगवाणीची शैलीमीमांसा करताना मी जो विचार केला, त्याचे दिङ्मात्र दर्शन प्रस्तुत निबंधात करीत आहे. तुकोबा हे वारकरी संप्रदायातील संत होत, म्हणून वारकरी परंपरेच्या संदर्भात विचार करणारी 'वारकरी शैली' ही संकल्पना मांडली आहे. साहित्येतिहासात युग ही संकल्पना स्वीकारली जाते. वाङ्मयेतिहासात वाङ्मयीन परंपरांचा शोध घेण्यासाठी युग ही कल्पना वापरली जाते, तर शैलीविज्ञानात एखाद्या विशिष्ट काळातील भाषेचे सर्वसाधारण शैलीगत स्वरूप म्हणून युगशैली ही संकल्पना वापरली जाते. युगशैली व वारकरी शैली या संकल्पनांत काही भेद आहे काय? युगशैली ही संकल्पना इतिहासाधिष्ठित आहे. युगशैलीचे स्वरूप हे सर्वसाधारण असते. वाङ्मयेतिहासात युगशैली निश्चित करीत असताना वाङ्मयीन भाषेची कालाधिष्ठित वैशिष्ट्ये केवळ नोंदवली जातात. युगशैली कालखंडाशी संबंधित असल्यामुळे त्या त्या विशिष्ट कालखंडात बरेवाईट जे जे काही लिखित साहित्य असेल, ते सगळेच त्या काळातील वाङ्मयीन सामग्री ठरते. एखाद्या विशिष्ट कालखंडाची एकूणच सर्जक प्रवृत्ती म्हणजे त्या युगाची शैली असे म्हणायला हरकत नाही.

---

१. "Meanwhile, the reader may ask himself why need i be conscious of all these things in Shakespeare's plays of which Shakespeare himself was perhaps not quite conscious? Why can not enjoy the play simply, as a contemporary would have done? The answer is of course that we cannot escape from the criticism of the past except throgh the criticism of the present."

शैलीचा विचार हा केवळ भाषेशीच निगडित ठेवता येत नाही. युगशैलीची संकल्पना आंतरव्यक्तिनिष्ठ, व्यक्तिबोलीबाह्य व संस्कृतीइतकी वरचढ असते. युगशैलीत विशिष्ट युगातील सर्व लेखनाचा समावेश होत असल्यामुळे, ह्या सर्व लेखनाला सामावून घेणारी, ह्या लेखनाचे विविध गटांत वर्गीकरण करून व्यवस्था लावणारी अशी ही युगशैलीची संकल्पना दिसते. या विशिष्ट कालखंडात काही लेखनप्रकार प्रभावी असतील तर काही क्वचितच वापरले गेलेले असतील. यावरून या कालखंडात प्रमाणके व चलघटक निश्चित होतील. ही प्रमाणके व चलघटक शैलीनिर्देशक असतात. एन्केव्हिस्टने संहितानिष्ठ संदर्भ व संहिताबाह्य संदर्भ असा भाग करून त्यात समाविष्ट होऊ शकणाऱ्या विविध चल घटकांची नोंद करणारा एक नमुना दिला आहे.

वारकरी शैली ही संकल्पना परंपराधिष्ठित आहे. परंपरेमध्ये ऐतिहासिक कालखंडापेक्षा एक सलग कालपरंपरा अनुस्यूत आहे. त्यामुळे विविध कालखंडांतून वर्तणारी एक सलग परंपरा इथे लक्षात घ्यावी लागते. शैलीविज्ञानातल्या युगशैली या कल्पनेचा कालिक विस्तार होऊन अनेक समान चल घटकांचा त्यामुळे प्रत्यय येतो.

वारकरी शैली म्हणजे वारकरी संप्रदायाच्या साहित्याची शैली होय. निवृत्तिनाथ ते निळोबा या कालखंडातील संबंधित संतांचे साहित्य हे वारकरी साहित्य आहे. एवढ्या विस्तृत कालखंडातील हे साहित्य प्रकृतिदृष्ट्या एकजिनसी आहे. संत बहिणाबाईंनी देवालयाच्या इमारतीचे रूपक कल्पून वारकरी संप्रदायाचे जे वर्णन केले आहे, ते एकजिनसीपणाच सूचित करणारे आहे.

वारकरी शैलीचा विचार करताना जसा वारकरी साहित्य हा महत्त्वाचा घटक ध्यानात घ्यावा लागतो; तसे साहित्यबाह्य घटकही ध्यानात घ्यावे लागतात. यांत वारकरी संप्रदायाचे दैवत, आचारधर्म, उपासना-पद्धती, पेहराव वगैरे गोष्टींचा समावेश होतो. साहित्य व साहित्यबाह्य घटक यांना जोडणारा तत्त्वज्ञान हा घटक आहेच. वारकरी संप्रदायाचे दैवत विठ्ठल, त्याचे विविधांगी निराळेपण, आचारधर्मांतर्गत वारी, भजन, नामस्मरण, कीर्तन यांचे व्यवच्छेदकत्व यांमुळे या संप्रदायाला शैलीगत परिमाणे प्राप्त होतात. वारकरी संप्रदायाचे तत्त्वज्ञानही पूर्वकालीन तत्त्वज्ञानांपेक्षा निराळे आहे. हा संप्रदाय शुद्ध भक्तिमार्गी संप्रदाय आहे. ज्ञानदेवांनी जे चिद्विलासवादाचे तत्त्वज्ञान मांडले, त्याचे खरे व्यवच्छेदकत्व त्याला मिळालेल्या भक्तीच्या परिमाणात आहे. भक्ती ही मुळात आहेच, ती काही वैयक्तिक भावना नाही. परमेश्वर स्वप्रीतिस्तव विलास करतो. याचा अर्थ प्रेम हे त्याच्या अंगभूत आहे. त्या प्रेमाला आस्वादण्यासाठी भक्तीची गरज आहे. भक्तीनेच केवळ प्रेम व प्रेमाची रुची आस्वादता येते. ज्ञानी फक्त स्वसंवित्तीच पाहतो. शैव फक्त शक्तीच जाणतो; पण दोन्हींचा जो गाभा ती परमभक्ती तिच्यावर आमची दृष्टी आहे, असे ज्ञानदेव सांगतात. परमात्मा हा मानवी जीवनाचा

जिव्हाळा आहे. त्याला बाहेर काढायचे म्हटले तरी अशक्य. अशा वेगळ्या नसलेल्या परमेश्वराचा अनुभव सतत जागवण्याचा उत्तम उपाय म्हणजे नामस्मरण. नामस्मरणामुळे जीवनाच्या अधिष्ठानी असलेला परमात्मप्रेमाचा झरा सतत उचंबळत ठेवता येतो. परमेश्वराला जीवाच्या भक्तीची उत्कंठा असल्यामुळे तो सगुण साकार होतो. यासाठी जीवाने भक्त होऊन भक्तीच्याच वाटेला लागावे असे ज्ञानदेव आवाहन करतात. या चिद्विलासवादी तत्त्वज्ञानाचे निनाद तुकोबांच्या अभंगवाणीत उमटणे स्वाभाविकच. एक प्रातिनिधिक उदाहरण पाहा :

तरूवर बीजा पोटीं । बीज तरूवरा सेवटीं ।।१।।
तैसे तुम्हां आम्हां जाले । एकीं एक सामावलें ।।धृ.।।
उदकावरील तरंग । तरंग उदकाचे अंग ।।२।।
तुका म्हणे बिंबच्छाया । ठायी पावली विलया ।।३।। (अभंग क्र० ३०६९)

चिद्विलासवादाचा पाया क्रीडा आहे. प्रभूची स्वप्रीतिस्तव क्रीडा म्हणजे हे जगत. या दृष्टिकोनामुळे जगाकडे पाहण्याचा एक खेळकर दृष्टिकोन प्राप्त होतो व तोच खेळकरपणा साहित्यातून आविष्कृत होतो. काव्याची प्रकृती क्रीडामय व त्याला क्रीडामय तत्त्वज्ञानच अभिव्यक्त करायचे, म्हणून ज्ञानदेवादी संतांचे काव्य हे क्रीडामय आहे. विविध खेळांची रूपके, विश्वव्यापी भरगच्च प्रतिमासृष्टी, लोककलेतील रचनाबंध, संतसाहित्याला लाभलेली गायन-वादन-नृत्य यांची परिमाणे त्यांचे सामूहिक पातळीवरील सादरीकरण या सर्व गोष्टी क्रीडामयताच सुचवितात. अशी ही वारकरी शैली मराठी संस्कृतीची शैली असल्याचे संस्कृतीच्या आघाडीच्या अभ्यासकांनी सिद्ध केले आहे.

## ३

तुकोबांच्या अभंगांचा रूप व नादमयता या दृष्टीने विचार करता येऊ शकतो. 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची' हे निर्धारक उदाहरण आहे. तुकोबांच्या अभंगरचनेचे शैलीगत विशेष शोधण्याच्या दृष्टीने भाषावैज्ञानिक तत्त्वांचा उपयोग होऊ शकतो, कारण वृत्त किंवा छंद यांचे रूपांतर्गत खूप भाषिक विशेष असतात असे रोमान याकोबसन (१९६०,३६५) यांचे म्हणणे आहे. काव्यबंधात कालौघात बदल न होता सातत्यच राहिले आहे. रूपक (मेटॅफर) व लक्षणा (मिटॉनिमी), आणि समांतर-न्यास (पॅरेलेलिझम) ही काव्याची दोन सनातन वैशिष्ट्ये आहेत. काव्यबंधाचा विचार हा सममूल्य भाषिक घटकांच्या आवर्तनाशी संबंधित असतो. वाक्य या घटकाच्या आवर्तनाला समांतर-न्यास (पॅरेलेलिझम) म्हणतात. आघात, अक्षर किंवा मात्रा यांच्या आवर्तनाला वृत्त किंवा छंद असे म्हणतात. विविध प्रकारच्या स्वर व व्यंजनात्मक आवर्तनाला यमक, प्रास, स्वरावृत्ती किंवा व्यंजनावृत्ती असे म्हणतात. (किपार्स्की, १९८१)

ओवी हा छंद आघातप्रधान आहे. संख्येच्या निर्बंधापासून मुक्त असे गद्यलेखनाचे विचारप्रधान आंदोलनतत्त्व व पद्यातील यमकतत्त्व या दोहोंच्या मिश्रणाने हा छंद तयार झालेला असल्याचे डॉ० ना०गो० कालेलकर (१९९०; १३१) यांचे म्हणणे अभंग या छंदासही लागू पडते. अभंग हा तालगेय आहे व ही तालगेयता भावगर्भ विचारांदोलननिष्ठ आघाताशी निगडित आहे.

उदाहरणार्थ :

भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ।।

'भवनिर्दाळण' व 'विठ्ठल' तसेच 'नाम' व 'काम' यांतील अनुक्रमे आघाततत्त्वयुक्त व यमकतत्त्वयुक्त परस्परसंबंधांमुळे एक अर्थप्रधान रचनाबंध तयार होतो. तसेच त्याची एकाच ओळीत पुनरावृत्ती झाल्यासारखी वाटते.

विठ्ठल भवनिर्दाळण नाम । (नाम) विठ्ठल नासी काम ।।

या वाक्यपातळीवरच्या समांतर-न्यासामुळे अर्थपातळीवरील समांतर-न्यास कळतो. ओळीतील घटकांच्या सममूल्य मांडणीमुळे हे घडते. ध्रुवपद हे अभंगप्रबंधाचे वैशिष्ट्य आहे. ते गायनाचे व अर्थाचेही एकक आहे. ध्रुवपद घोळवले जाते, याचा समांतर-न्यास म्हणून विचार अर्थपूर्ण ठरतो.

आवर्तनाचे अंग म्हणून यमकतत्त्वाचा विचार महत्त्वाचा ठरतो. स्वरावृत्ती व व्यंजनावृत्ती यामुळे निर्माण होणारी नादमयता यमकतत्त्वाचाच भाग असते. ध्वनिपरिणामांच्या दृष्टीने केवळ यमकाचे महत्त्व नाही तर वाक्य व अर्थ या दृष्टीनेही यमकाचा विचार महत्त्वाचा ठरतो. यमकान्वित पदांतील साधर्म्य व वैधर्म्य यांच्याद्वारा स्पष्ट होणाऱ्या सामीप्यमूलक संबंधांचे विश्लेषण उद्‌बोधक ठरते. उदाहरणार्थ :

तुका म्हणे माझे । हेचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख । आवडीने ।।

यातील पहिले दोन चरण एका भावबंधाचे निदर्शक, तर तिसरा चरण दुसऱ्या भावबंधाचा निदर्शक आहे. या दोहोंचा अन्वय यमकाने साधला गेला आहे. याला सामीप्य म्हणायचे. श्रीमुख आवडीने पहाणे हेच सर्व सुख असे तुकोबा म्हणतात. श्रीमुख या घटकावयवाने परमेश्वर दर्शनाचा, परमेश्वर प्रेमानुभवाचा भाव सूचित होतो. यामुळे लक्ष्यार्थाची जाणीव होते.

दगडाची नाव आधीच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ।।

'दगड' व 'जड' या यमकान्वित पदांत गुणीगुणवाचक भाव स्पष्ट आहे. हा साधर्म्यमूल संबंध आहे. 'दगडाची नाव' व 'तारू जाणे' यांतील अप्रत्यक्ष अन्वय यमकामुळे स्पष्ट होतो. 'दगडाची नाव' व 'काय तारूं जाणे' यात उघडच विरोध आहे. दगडाच्या नावेला पुन्हा दगडच तारावयाचे आहेत. हे कसे शक्य आहे? अर्थातच अशक्य. अयाचितवृत्ती असलेल्या गोसाव्याच्या संदर्भात तुकोबांचे वरील विधान लक्षात

घेतले तर त्याचे रूपकीय कार्य फारच ठसते.

आता मूलत: वैधर्मीय असलेले व यमकाने समन्वित झालेले एक उदाहरण पाहू :

सुख पाहतां जवापाडें । दु:ख पर्वताएवढें ।।

'जवापाडें' व 'पर्वताएवढें' यांतील अंत्ययमकामुळे नातेसंबंध स्पष्ट होऊन ही पदे ठळक होतात. परिणामत: 'सुख' व 'दु:ख' ही पदेही ठळक होतात. सुखाने खरेतर पर्वताएवढे असावे व दु:ख जवाएवढे. पण ती आकांक्षा फोल ठरते. उलट, जवाएवढ्या सुखासाठी पर्वताएवढे दु:ख पाहावे लागते.

तुकोबांच्या अभंगवाणीतील विविध प्रकारच्या वाक्यपातळीवरील समांतर-न्यासाची उदाहरणे विश्लेषिता येऊ शकतात. काही उदाहरणांतील व्याकरणिक प्रवर्गांचे आवर्तनही विश्लेषिता येऊ शकते.

उदाहरणार्थ :

ढेकणाचे संगे हिरा जो भंगला । कुसंगे नाडला तैसा साधु ।।
१ २

ओढाळाच्या संगे सात्त्विक नासली । क्षण एक नाडती समागमें ।।
१ २

डांकाचे संगती सोने हीन जाले । मोल ते तुटले लक्ष कोडी ।।

नामपदबंध + पूरक ... असे हे व्याकरणिक प्रवर्गांचे आवर्तन आहे. या समांतर-
१ २
न्यासामुळे तळमळ, उत्स्फूर्तता, संवाद साधणे, लोकांना शहाणे करण्याची खटपट, भक्तांच्या ठायी असणारी आर्तता, उपास्य दैवतावरचा दृढ विश्वास, परमेश्वरापाशी संवाद साधण्याची धडपड वगैरे काही गोष्टींचा प्रत्यय येतो. तुकोबांची भक्त म्हणून आर्तता व जगदुद्धाराची तळमळ या दृष्टीने त्यांच्या कवितेतील आवर्तन महत्त्वाचे ठरते.

४

तुकोबांच्या काव्यात्म वाक्याचा विचार करताना काही एक क्रम निश्चित करावा लागतो. प्रथम पदांची वैशिष्ट्ये ध्यानी घ्यावी लागतात. कारण पदे ही वाक्यात कार्यशील होतात. पदविन्यास हा स्वतंत्रपणे अभ्यास करण्याजोगा भाग आहे. व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या भाषेत पदांचा विकार (इन्फ्लेक्शन) व सिद्धी (डेरिव्हेशन) या दोन स्तरांवर व्याकरणिक विचार करता येतो. विकारजन्य पदे ही वाक्यरचनेच्या दृष्टीने महत्त्वाची असतात. एकाच रूपघटकाची विविध व्याकरणिक विकरणाने पुनरावृत्ती झालेली दिसते. तिचा पदपातळीवर विचार, एकाच पदाच्या व्याकरणिक विकरणाने मिळणाऱ्या परस्परविरोधी पदांच्या जोड्या व त्यांचा काव्यात्म वापर, काही पदांची संक्षिप्त व

वैशिष्ट्यपूर्ण रूपे, अभंगांच्या एकूण परिवेशातच उलगडणारी दुर्बोध पदे, बोलीभाषेतील पदे, नामधातू व क्रियानामे यांची निर्मिती व वापर, सामासिक पदे, त्यांचे विभाजन, संबंधी सर्वनामांचा विलोप, सामासिक शब्दांतील उत्तरयोगी पूर्वयोगी करणे, अभ्यस्त शब्दांचा वैशिष्ट्यपूर्ण वापर, बोलीभाषेतील शब्दांचा मुक्त वापर इत्यादी बाबींची पदविन्यासाच्या अंगाने सोदाहरण चर्चा करता येऊ शकते. तत्सम संस्कृत शब्दांपासून बोलभाषेत वापरल्या जाणाऱ्या शब्दांपर्यंत विविधता असणारा असा तुकोबांचा शब्दनिधी आहे.

तुकोबांच्या काव्यात्म वाक्याची बरीच वैशिष्ट्ये कळतात. तुकोबांच्या अभंगवाणीतील काव्यात्म वाक्य कमालीचे लवचीक आहे. व्याकरणिक वाक्यातील काटेकोरपणा मोडल्यामुळे ही लवचीकता येते. वाक्यात सर्वसाधारणपणे ज्या व्याकरणिक घटकांची उपस्थिती अभिप्रेत असते, त्या घटकांचा विलोप हे तुकोबांच्या काव्यात्म वाक्याचे वैशिष्ट्य आहे. या विलोपित पदांमुळे वाक्यातील उर्वरित पदे लक्ष्यवेधी ठरतात. काव्यात्म वाक्य बंदिस्त असते. विशिष्ट छंद अगर वृत्त हे त्याचे संघटनतत्त्व असते. संपूर्ण काव्याच्या संघटनतत्त्वाशी काव्यात्म वाक्य बांधील असते. या संघटनतत्त्वामुळे पदांचे परस्परसंबंध निश्चित होतात. त्यामुळे वाचकाला विलोपित पदांचा बोध होतो. परिणामत: वाचकाच्या सर्जक सहभागाला वाव मिळतो. छंद किंवा वृत्त या संघटनतत्त्वांमुळे वाक्य लयबद्धही होते. साहजिकच यति व विरामाच्या जागा निश्चित होतात. यति व विरामामुळे काव्यात्म वाक्य अर्थदृष्ट्या नियंत्रित होते.

तुकोबांच्या काव्यात्म वाक्यातील पदक्रम एका बाजूला स्वतंत्र आहे व दुसऱ्या बाजूला छंदाच्या परिघात यमक या संघटनतत्त्वाशी बांधील आहे. पदक्रम स्वतंत्र असल्यामुळे यमक या संघटनतत्त्वाशी कृत्रिमपणे बांधील नाही, तर लयतालपोषक व अर्थपोषक असा नैसर्गिक क्रम आहे. म्हणून पदक्रमभंग हे तुकोबांच्या काव्यात्म वाक्याचे वैशिष्ट्य आहे. काव्यात्म वाक्यात अन्वय लावणे अवघड ठरते, इतका हा पदक्रमभंग आहे. मराठी या बहुतांश प्रत्ययप्रधान व काहीशा शब्दक्रमप्रधान (काव्यातील दर्शन) भाषेच्या मुक्त व लवचीक व्यवस्थेचा वापर करून घेतल्यामुळे व त्याला विविध संघटनतत्त्वे असणाऱ्या अभंग या छंदाची जोड मिळाली; त्यामुळे लवचीक पण बंदिस्त असे एकात्म दर्शन घडते.

संभाषणात सर्वच पदघटकांची आवश्यकता नसते. यामुळे संभाषण मितभाषी असते. तुकोबांची कविता ही या अर्थाने बोलणारी कविता आहे. ती अभंग या छंदातून बोलते म्हणून ती गाणारीही आहे. परिणामत: तिचे लिखित रूप सहजासहजी उमगत नाही. वाचकाला आपली भाषिक व साहित्यिक क्षमता वापरून सर्जकतेने सहभागी व्हावे लागते.

समांतर-न्यास व अधिअनुचलन (पॅरॅटॅक्सिस) ही तुकोबांच्या अभंगवाणीतील काव्यात्म वाक्याची वैशिष्ट्ये आहेत. समांतर-न्यासाची चर्चा यापूर्वी केली आहेच. अधिअनुचलनाची दोन विविध उदाहरणे पाहू :

बैसों खेळूं जेवूं । तेथे नाम तुझे गाऊं ।। (७३३)

↓ ↓

अधिअनुचलन सुसंगत विचार

सुसंगत विचार

↓

राम वेळोवेळा आम्ही गाऊं ओवियें ।

दळितां कांडिता जेवितां ग बाइये ।। (११०६)

↑

अधिअनुचलन

तर एका चरणार्धात अधिअनुचलन व दुसऱ्या चरणात त्याच्याशी विरोधी विचार असतो. उदाहरणार्थ,

जन धन तन । केलें तृणाही समान ।। (५२१)

↓ ↓

अधिअनुचलन विरोधी विचार

↑ ↑

जन धन तन । वाटे लेखावें वमन ।। (१८८५)

अधिअनुचलनात जेवढे घटक असतात, त्यांतील एकेका घटकाचे स्वतंत्र वाक्य होऊ शकते. म्हणून संबंधित वाक्यात गर्भित समांतर-न्यास (इम्प्लाइड पॅरॅलेलिझम्) असतो. वरील उदाहरणांतील वाक्यांमुळे अभिप्रेत विषयाचे प्रस्तुतीकरण ठाशीवपणे होते. जे तळमळीने, उत्कटतेने म्हणावयाचे आहे, ते पुनरावृत्तीमुळे ठसते. प्रतिपक्षात्मक मांडणीचा समांतर-न्यास हे तुकोबांच्या काव्यात्म वाक्याचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे. वास्तव हे कधीच एकांगी नसते. मात्र त्याचे आपले आकलन एकांगी असते. परिणामत: आदर्श आणि व्यवहार यांपैकी कुठल्यातरी एकाच अंगाचा एकांगी पुरस्कार होतो. यामुळे व्यक्तीच्या जीवनात तसेच सामाजिक जीवनात संतुलन राहात नाही. सर्वसाधारणपणे पारंपरिकतेने आदर्शाच्याच अंगावर भर दिला जात असल्यामुळे नीतीचाच एक भाग असलेल्या व्यवहाराचे भान राहात नाही. तुकोबा आदर्श व व्यवहार यांची सांगड घालून ते भान आणून देतात. एकाच पदाची पुनरावृत्ती होऊन साधलेल्या गर्भित वाक्य-समांतर-न्यासाच्या उदाहरणांत क्रियापदांच्या पुनरावृत्तीमुळे अधीरता, ठामपणा,

निषेध, कळकळ या मनोवृत्तींचा बोध होतो. जगदुद्धाराच्या तळमळीपोटी तुकोबा संवाद साधतात. संबोधनार्थी, आज्ञार्थी, विध्यर्थी, प्रश्नार्थी अशा वाक्यांद्वारा तुकोबा संवाद साधतात. अभंगाच्या परिवेशात अशी वाक्ये सहजपणे येतात. तुकोबांच्या अभंगवाणीतील काव्यात्म वाक्याची ही काही वैशिष्ट्ये. अजूनही काही वैशिष्ट्ये मिळू शकतात. तुकोबांच्या काव्यात्म वाक्याचा महावाक्याच्या संदर्भात विचार करता येऊ शकतो.

५

तुकोबांच्या प्रतिमासृष्टीचा अभ्यास करताना नवी दृष्टी वापरता येऊ शकते. प्रतिमा ही नवीन समीक्षेतील संकल्पना आहे. तिचे उपयोजन कोणकोणत्या अर्थाने होऊ शकते हा विचार महत्त्वाचा आहे. सर्वच संतांच्या साहित्याचे प्रधान आशयसूत्र हे भक्तितत्त्व हे आहे. भक्तितत्त्व हे अतींद्रिय अनुभवाला इंद्रियांकरवी भोगायला लावणारे तत्त्व आहे. मन वाचातीत अशा ईश्वरानुभवाला मनगोचर वा इंद्रियगोचर करण्यासाठी विविध लौकिकानुभवातील उदाहरणांनी, दृष्टांतांनी हे कार्य होते. अनुभव इंद्रियसंवेद्य करायचे तर वाक्चातुर्य हे हवेच. वाक्चातुर्य म्हणजे प्रतिभेच्या बळाने निर्मिलेले विश्व. इथे भक्तितत्त्व व काव्यतत्त्व यांची एकरूपता होते. संतांच्या वाङ्मयातील प्रतिमा या अलंकरणरूप नाहीत; तसेच त्या अप्रस्तुतही नाहीत. जिच्यामुळे आध्यात्मिक अनुभव प्रस्तुत ठरतो, त्या व्यावहारिक जगातील प्रतिमासृष्टी ही जगाच्या वास्तव स्वरूपापेक्षा मूल्ययुक्त स्वरूपाने सिद्ध झालेली असते. म्हणून इथे मूल्यांच्या जाणिवेच्या अर्थ-प्रकाशातच इंद्रियसंवेद्य प्रतिमा निर्माण होतात. ह्या इंद्रियसंवेद्य प्रतिमा इंद्रियांनी भोगून परत हृदयात भोगायच्या, त्यामुळे प्रतिमा सार्थ होतात. तुकोबांच्या अभंगांतील प्रतिमानरूप लौकिकसृष्टी मूल्ययुक्त आहे. ही मूल्ये अनुभवाच्या संदर्भात समजून घेतली नाहीत तर ती मूल्यगर्भ विधाने केवळ अलंकरणरूप सुभाषिते ठरतील. तुकोबांची विधाने सुभषिते म्हणून वापरताना संदर्भापासून तोडली जातात. प्रतिमेच्या संदर्भात बिंब-प्रतिबिंब असे म्हणण्यापेक्षा बिंब-प्रभा असा प्रयोग करणे अधिक युक्त. कारण संतांच्या काव्यात उपमा-रूपक-उत्प्रेक्षा-दृष्टांताची जी उतरंड येते, त्यामुळे उपमाने घडतात. उपमेयाला जर बिंब मानले तर ही उपमाने त्या बिंबाची प्रभाच ठरतात. अभंगाचा घाट व प्रतिमा यांचा विचार करताना धृपद हे उपमेय किंवा दार्ष्टान्तिक असते. इतर ओळींतील उपमाने ही दार्ष्टान्तिकाचाच आशय प्रक्षेपित करीत असतात. परिणामत: आशय व घाटाचा विस्तार होत असतो. प्रतिमेच्या संदर्भातील पारंपरिक प्रतिमा व अपारंपरिक प्रतिमा हा भेद रूढ अर्थाने बरोबर नाही. एखादी पारंपरिक प्रतिमा नवी संवेदनशीलता प्रकट करीत असेल, तर अपारंपरिकच ठरेल. प्रतिमा ही समग्र कलाकृतीच्या संरचनेचा एक भाग असल्यामुळे त्या संदर्भातच तिचा विचार व्हायला हवा. तुकोबांच्या अभंगांतील प्रतिमांची काही वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे :

तुकोबांच्या उपमानप्रतिमा या सबल निर्देशक तर उपमेयप्रतिमा दुर्बल निर्देशक असतात. त्यांची मांडणी द्वैती असते; पण या द्वैताचा निरास होऊन अद्वैतानुभवाचा प्रत्यय यावा, अशी तुकोबांची मनीषा असते. दुर्बळांमुळेच सबळांचे थोरपण सिद्ध होते. भक्तीमध्ये देव आणि भक्त असे द्वैत असतेच. भक्ती त्यामुळेच रंगते. बौद्धिकता, चिंतनात्मक, विचारप्रवणता ही तुकोबांच्या प्रतिमांची वैशिष्ट्ये आहेत. काही मूल्ययुक्त प्रतिमांची प्रतिपक्षात्मक मांडणी करून तुकोबा आपल्या कल्पकतेची व बुद्धिमत्तेची चुणूक दाखवितात. कधी एकाच प्रतिमेचा विस्तार करून तुकोबा आपले म्हणणे युक्तिवादपूर्वक मांडतात. रूपकातिशयोक्ती हे तुकोबांच्या प्रतिमेचे वैशिष्ट्य आहे. रूपकाचा सरळ वापर होऊन निर्माण झालेल्या प्रतिमा हेही त्यांच्या प्रतिमांचे वैशिष्ट्य आहे. नादप्रतिमा तसेच यमकजन्य नादसाम्यातून मानसिक पातळीवर जाणवणाऱ्या प्रतिमा हे तुकोबांच्या प्रतिमांचे एक वैशिष्ट्य आहे. चेतना व कृतिशीलता हे तुकोबांच्या प्रतिमांचे वैशिष्ट्य आहे. अमूर्त अशा आध्यात्मिक तत्त्वांची चिंतनगर्भ प्रतीती ही कृतिशील असल्यामुळे ती तशाच स्वरूपात अभिव्यक्त होते. तुकोबा एकच प्रतिमा विविध संदर्भांत वापरत. परिणामत: त्या प्रतिमानाच्या नानाविध गुणवैशिष्ट्यांचे सूक्ष्मावलोकन कळतेच व त्यामुळे त्या प्रतिमेची संरचनागत बरीच वैशिष्ट्ये स्पष्ट होतात. उदाहरणार्थ, तुकोबांच्या गाथेत श्वानप्रतिमा एकूण बेचाळीस वेळा आलेली आहे. त्यातून अभक्त दुर्जन व भक्त या उपमेयप्रतिमा समूर्त होतात. गुणाकडे अवगुण म्हणून पाहिल्यानंतर प्रतिमेचा चेहराच पालटतो व संबंधित प्रतिमेचे द्विदलत्व लक्षात येते. तुकोबांची प्रतिमासृष्टी विश्वव्यापी आहे. विश्वातील बारीकसारीक घटकांचा मूल्ययुक्त वापर या प्रतिमासृष्टीत येतो. तुकोबांच्या प्रतिमासृष्टीत नित्याच्या वस्तू, प्राणी यांचे आधिक्य आहे. या वस्तू व प्राणी यांच्या सर्वसाधारण अनुभवाचा आधार घेऊन तुकोबा विचार व भावना यांची खोली वाढवतात. ही खोली केवळ संबंधित वस्तू वा प्राणी यांच्या स्तब्ध वर्णनाने वाढत नाही, तर त्यांच्या ठायी असलेल्या व्यवच्छेदक गुणांचे सूक्ष्मावलोकनजन्य नवे व कल्पकतापूर्ण दर्शन ते घडवतात, म्हणून वाढते. परिणामत: तो अनुभव चित्तात खोलवर ठसतो. काव्यातील प्रतिमांचे हेच महत्त्वाचे कार्य असते.

६

तुकोबांच्या अभंगवाणीतील कथांची कथनमीमांसा ''तुकोबांच्या अभंगांची शैलीमीमांसा'' या ग्रंथामध्ये एका स्वतंत्र प्रकरणात केलेली आहे. नीतितत्त्वांचा प्रसार करण्यासाठी कथा हे माध्यम परिणामकारक असल्यामुळे सर्वच संप्रदायांनी या माध्यमाचा वापर केला आहे. संतांनी नीतितत्त्व व भक्तितत्त्व यांच्या सम्यक् प्रसारासाठी कथांचा वापर करणे स्वाभाविकच म्हटले पाहिजे.

कथनगुणपरता हा कथावाङ्मयाचा समान गुणधर्म. तुकोबांच्या अभंगांचा कथनगुणपरतेच्या अंगाने विचार व्हायला हवा होता. शैलीमीमांसा व कथनमीमांसेचा संबंध आहे. रशियन रूपवादी व फ्रेंच संरचनावादी यांनी कथनपर साहित्याचा नव्या दृष्टीने विचार करून कथनमीमांसेची उभारणी केली आहे. सोक्यूरची चिन्हमीमांसा ही या कथनमीमांसेचा पाया आहे. रशियन रूपवाद, संरचनावाद, मानववंशविज्ञान, भाषाविज्ञान यांनी विकसित केलेल्या मर्मदृष्टींचा शैलीविज्ञान उपयोग करून घेते.

७

तुकोबांच्या अभंगवाणीतील अवतरणक्षम विधानांनी जुन्या-नव्या अशा सर्वच अभ्यासकांचे लक्ष वेधून घेतले आहे. व्यावहारिक प्रबोधनशक्ती, सौंदर्यशक्ती यामुळे अवतरणक्षमतेची व्यापकता सिद्ध झालेली आहे. तुकोबांच्या अवतरणांमध्ये एक मंत्रशक्ती आहे. या मंत्रशक्तीचे रहस्य शोधणे, ही अवतरणे ज्या मुखातून निघाली त्या मुखनायकाचे व्यक्तिमत्त्व, अवतरणांचा रचनाबंध, रचनाबंधामुळे मानवी मनाला होणाऱ्या विविध जाणिवा, अवतरणांत प्रत्ययाला येणाऱ्या वैश्विक व सार्वकालीन सत्यांमुळे अवतरणांना लाभलेला चिरकालीन ताजेपणा या गोष्टींचा शोध घेता येतो.

गीतेतील अक्षरे ही आत्म्याला प्रकट करणारे मंत्रच होत असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे. गीतेच्या संदर्भात हे जितके सार्थ आहे तितके ते सबंध संतसाहित्याबाबतही सार्थ आहे. म्हणून संतवाणी ही मंत्रवाणी आहे. मंत्रवाणी ही दैवी वाणी असते. दैवी वाणी ही प्रेरक-प्रचोदक असते. ही प्रेरकता ती वाणी अखंड वाक्यरूप असते म्हणून असते. अखंड वाक्य, अभंग वाक्य हे महावाक्यस्वरूप असते. महावाक्य हे वैखरीच्या रूपाने मूर्त होते. मंत्रदृष्ट्या ऋषींनी अवर (निम्नस्तरीय) ऋषींना वैखरी-स्वरूपात उपदेशपद्धतीने मंत्र प्रदान केले. पण याचबरोबर हे मंत्र जेथून अवतरले, त्या उगमस्थानाचा साक्षात्कार करून घ्या, असे सुचविले. मंत्राची सार्थकता यातच असते. ज्ञानदेव 'आत्मा अवतरविते' मंत्र म्हणतात ते आत्मतत्त्व हे उगमस्थान. परावाणी तत्त्व म्हणजे परतत्त्व. यासाठीच काव्याला परतत्त्वाचा स्पर्श लाभावा असे ज्ञानदेव म्हणतात. तुकोबांनीही 'माझा शब्द नव्हे एकदेशी । सांडी गवशी कोणाला ।।' असे का म्हटले, त्याचे मर्म ध्यानात येते.

महावाक्य स्वरूपातल्या वैखरीत तुकोबांसारख्या महाकवीचा अनुभव साठलेला असतो. तो आकळण्याऐवजी त्या अनुभवाच्या स्पष्टीकरणार्थ दिलेली उदाहरणे किंवा स्फुटानुभव वैखरी पातळीवर आकळतो. यमकतत्त्व, ध्वनींची पुनरावृत्ती, ध्वनिविरोधजन्य अर्थविरोध, मानसिक परिणाम करणारे घटक महत्त्वाचे असतात. थोडक्यात, भाषावैज्ञानिक तत्त्वांचा वापर करून वैखरी पातळीवरच्या आलंकारिक कार्य पार पाडणाऱ्या अंगाला समजून घेता येते.

तुकोबांची अवतरणक्षम वचने तुकोबांना अभिप्रेत अर्थाने वापरली जात नाहीत. तुकोबांचे महावाक्य व त्यातील अवतरणक्षम विधान, तुकोबांचा महावाक्यांतर्गत अर्थ व चलनातील सर्वसाधारण अर्थ या पद्धतीने तुलनात्मक तपासणी करता येऊ शकते. तुलनात्मक अध्ययनावरून काही निष्कर्ष हाती लागू शकतात. तुकोबांची अलौकिक आध्यात्मिक अनुभव व्यक्त करणारी महावाक्ये मराठी भाषक समाजाकडून लौकिक अनाध्यात्मिक अनुभव व्यक्त करण्यासाठी वापरली जातात. आपल्या लौकिक कृतींना भव्य परिमाण लाभावे व आपणास कृतकृत्य वाटावे, यासाठी तुकोबांच्या मुखाने आपला अनुभव व्यक्त करण्याची धडपड होते. यात सामान्यांपासून विद्वानांपर्यंत, वृत्तपत्रीय लेखन करणाऱ्यांपासून साहित्यनिर्मिती करणाऱ्यांपर्यंत सर्वांचा सहभाग असतो. म्हणून ग्रंथांची अन्वर्थक शीर्षके, सभासमारंभातील भाषणे, दैनंदिन व्यवहारातील सामान्य संभाषणे, अग्रलेखांची शीर्षके, ग्रंथांचे उपोद्घात, उपसंहार यांसाठी तुकोबांची भाषा वापरली जाते.

## ८

तुकोबांच्या अभंगवाणीतील पारिभाषिक संज्ञांचा भावार्थविचार समजून घेणे तितकेच महत्त्वाचे आहे. वारकरी संप्रदाय हा अनुभवप्रतीतिवादी आहे, केवळ ज्ञाननिष्ठ नाही. परिणामत: इथे शुष्क अर्थवादाला स्थान नाही. भावार्थ, संकल्पना यांना महत्त्व आहे. शास्त्राची परिभाषा ही वाच्यार्थक असते; पण भक्तिमार्गी वारकरी संप्रदायाची परिभाषा ही स्वानुभावांच्या बोलांची ओल कायम टिकवून ठेवणारी, भावार्थक अशी आहे असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे.

एखाद्या विशिष्ट क्षेत्राशी संबद्ध क्षेत्रनिर्देशक पदे ही त्या क्षेत्राची सर्वसाधारण परिभाषा असते. ह्या परिभाषेला स्तरभाषा (रजिस्टर) असे म्हणतात. ही परिभाषा क्षेत्रस्थ आचारविचार, तत्त्वज्ञान, दैवतविचार इत्यादी बाबींचा निर्देश करणारी असते. कालौघात नवीन संप्रदाय उदयास येणे, जुन्या तत्त्वज्ञानाची बैठक बदलणे किंवा नवीन तत्त्वज्ञानाची स्थापना करणे, आचारविचारात बदल होणे वगैरे घडामोडी घडत असतात. रूपदृष्ट्या पद तेच असले तरी त्यामागील संकल्पना बदलते. भाषाविज्ञानात याला अर्थविन्यासात्मक बदल (सिमॅंटिक चेंज) असे म्हणतात. एखाद्या संप्रदाय-विशिष्ट लेखकाच्या शैलीचा अभ्यास करताना त्याच्या साहित्यकृतीत येणाऱ्या संज्ञांपाठीमागचा भावार्थ समजून घेणे हे फार आवश्यक असते. या अभ्यासामुळे पारंपरिक संकल्पना व संप्रदायविशिष्ट लेखकाची संकल्पना यांतील नाते कळते. हे नाते संकल्पनाविस्तार (एक्स्टेंशन), संकल्पनाविपथन (डेव्हिएशन), संकल्पनालोप (सिंकोप), संकल्पनाविपर्यय (मेटॅथिसिस) वगैरे स्वरूपाचे असू शकते. त्यांच्या सापेक्षानुसार संप्रदायाची भूमिका, लेखकाचे व्यक्तिमत्त्व यांची कल्पना येते. प्रस्तुत अभ्यासानंतर जे निष्कर्ष हाती येतात,



अनुक्रमणिका

ते याप्रमाणे :

* तुकोबांनी भारतीय तत्त्वविचारातल्या सर्व संज्ञा तपासून, त्यांच्यातील ग्राह्याग्राह्यता पारखून, त्यांच्या स्वीकारनकाराचे धोरण ठरविले आहे. विशिष्ट संज्ञा ही केवळ ज्ञानरूप असेल व भावजागृती करीत नसेल तर ती केवळ अर्थवाद करणारी म्हणून टाळलेली आहे.
* पारंपरिक तत्त्वविचारातील संज्ञांशी भक्तितत्त्वाशी सांगड घालून त्यांना भक्तिमुखी बनविले आहे.
* नामस्मरण हा भक्तीचा अत्युत्तम मार्ग असल्यामुळे योगयागतप व इतर आगम-निगमोक्त गोष्टींना सपशेल नाकारले आहे. ही नकारांची रीत कधी संज्ञारूपाने स्वीकारायची; पण त्यात आशय मात्र आपल्याला अभिप्रेत असा भरायचा, याला संकल्पनाविपर्यय म्हणता येऊ शकते.
* जीवनाचे ध्येय आध्यात्मिक उन्नती हेच असेल, तर तर्ककर्कश चर्चेने ते गाठता येणार नाही. त्यासाठी अंत:करणात परमेश्वर ठसविणे आवश्यक आहे. यामुळे अंत:करणशुद्धी होईल. अंत:करण प्रभुप्रेममय करण्यासाठी नामस्मरण उत्तम उपाय असल्याचे संबंधित संज्ञा ध्वनित करतात. या उपायात देहदंड नाही, श्रेष्ठकनिष्ठता नाही, ज्ञानी-अज्ञानी, जातीपातीचा असा विषम भेद नाही. एक सामूहिक चळवळ म्हणून वारकरी पंथाने एक विशिष्ट आचारधर्म स्वीकारलेला होता. त्याचा अनुवाद संतांनी जिवेभावे केला, हे तुकोबांच्या पारिभाषिक संज्ञांच्या भावार्थातून दिसते.

काव्यमीमांसा मध्यवर्ती ठेवून शैलीमीमांसा कशी होऊ शकते याचे पुनरावलोकन केले आहे. शैलीमीमांसेच्या अधिकाधिक अंगांचा वापर हा त्या काव्याच्या व्यापकतेमुळे झाला आहे, हे निश्चित! ■

## संदर्भ


( १ ) एलिएट, टी०एस्० १९४४. शेक्स्पीयर अँड पॉप्युलर ड्रॅमेटिक ट्रॅडिशन. एस्०एल्० बेथेल, पी० एस्० किंग, अँड स्टेपल्ज लि० वेस्टमिन्स्टर.

( २ ) एन्कीस्ट, स्पेन्सर आणि ग्रेगरी. १९६४. लिंग्विस्टिक अँड स्टाइल. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन.

( ३ ) कालेलकर, ना० गो० १९९०. ध्वनिविचार, मौज प्रकाशन, मुंबई.

( ४ ) क्रिपास्कीं, पॉल. १९८१. 'दि रोल ऑफ लिंग्विस्टिक्स इन ए थिअरी ऑफ पोएट्री'. समाविष्ट : ''एसेज इन मॉडर्न स्टायलिस्टिक्स''. (संपा०) रोनाल्ड फ्रीमन, मेथ्युएन, लंडन व न्यूयॉर्क.

( ५ ) याकोब्सन, रोमान १९६०. 'लिंग्विस्टिक्स अँड पोएटिक्स' समाविष्ट : ''स्टाइल इन लँग्विज्''. (संपा०) टि०ए० सेबॉक. एमआयटी. मॅसेच्युसेट्स.


चलभाष : 9423182147





अनुक्रमणिका

# प्रकाशकाच्या नजरेतून

**- रामदास भटकळ**

माझी मातृभाषा कोकणी. घरात मी कोकणीतच बोलत असे. शाळेत आमच्या काळी सुरुवातीला सातवीपर्यंत मराठी माध्यम आणि पुढील चार वर्षे इंग्रजी माध्यम अशी पद्धत होती. मधे कधीतरी हिंदी हा विषय होता. त्याशिवाय स्वातंत्र्यपूर्व काळात जे स्वदेशी वारे होते त्यामुळे बंबई हिंदी विद्यापीठ, राष्ट्रभाषा प्रचार समिती यांच्या हिंदी वर्गात जाऊन परीक्षाही दिल्या जात. त्यात एका संस्थेत उर्दू लिपीही शिकवली जायची.

हे सगळे आता सांगायचे कारण की आम्ही बालपणापासून बहुभाषिक होतो. त्यामुळे कोणत्याही एकाच भाषेचा विचार करण्याची सवयच नव्हती. बहुतेकजण आपण अमूक एका भाषेतच विचार करतो असे समजतात. निदान तसे म्हणतात. परंतु माझ्या बाबतीत आणि मी ज्या शाळेत गेलो तशाच शाळेत जाणाऱ्यांच्या बाबतीतही निरनिराळ्या विषयांच्या फक्त अभ्यासासाठीच नव्हे; तर विचारासाठी सुद्धा निरनिराळ्या भाषा वापरत असत. आजही मी घरातल्या काही कुटुंबीयांशी कोकणीत बोलतो, मित्रमंडळींशी मराठीत, बाजारात हिंदी, गरज पडल्यास गुजरातीत, व्यावसायिकांशी इंग्रजीत आणि क्वचितप्रसंगी परदेशी मोडक्या तोडक्या जर्मनमध्ये.

हळूहळू लक्षात आले की अशी बहुभाषिक सोय फक्त माझ्यासारख्यांसाठी नाही तर आपल्या देशात जवळजवळ सर्वांसाठी आहे. अगदी खेड्यातला अल्पशिक्षित डोळ्यांसमोर आणला तरी तोदेखील त्याच्या गरजेनुसार अनेक बोली किंवा भाषासुद्धा वापरतो. आपल्या देशात दर बारा कोसांवर भाषा बदलते असे भाषाशास्त्रज्ञ सांगतात. जलद प्रवासाच्या सोयी उपलब्ध होण्यापूर्वी देखील भाविक दूरवर यात्रेसाठी जायचे. त्या काळात भाषेचा प्रश्न ते कसे सोडवत असतील? धीम्या प्रवासाच्या दिवसांत हळूहळू बदलणारी भाषा तात्पुरती पचवणे त्यांना शक्य होत असावे. नाहीतर रामेश्वर ते काशी असा प्रवास करणार तरी कसे?

हे बहुभाषिकत्व लक्षात घेऊनच आपल्याला भाषेचा विचार केला पाहिजे. युरोपमधील देशांत लिपी एकच असल्याने प्रत्येकाला इतर भाषा शिकणे सोपे गेले आणि तेथील बहुतेक रहिवासी हे बहुभाषिक झाले. पूर्व युरोप हा रशियाच्या प्रभावाखाली आला आणि एकेकाळची सोविएत राष्ट्रे यांनीही एकाच स्लाविक लिपीचा स्वीकार केला.

वास्तविक भारतीय भाषांनी देवनागरी लिपी स्वीकारली असती तर फार मोठा प्रश्न सुटला असता. तसे न होताही आम्ही प्रकाशकांनी हे बहुभाषिकत्व स्वीकारायला हवे होते. ब्रिटिश प्रकाशकांच्या शाखा हिंदुस्थानात निघाल्या. त्यांनी, विशेषत: शालेय पुस्तके प्रकाशित करणाऱ्यांनी, काही प्रमाणात हे काम केले. परंतु अजूनही काही शासकीय किंवा धर्मविषयक संस्था वगळता या दिशेने फारशी प्रगती झालेली नाही. त्यांतल्या त्यात इंग्रजी आणि एक स्थानिक भाषा यांत प्रकाशन करणारे काही प्रकाशक विखुरलेले आहेत. महाराष्ट्रात इंग्रजी आणि मराठी या दोन्ही भाषांत आपला ठसा उमटवणारे कितीसे आहेत? हे करणे कठीण आहे याची मला कल्पना आहे. आम्ही पॉप्युलर प्रकाशनमध्ये इंग्रजी आणि मराठी या दोन्ही भाषांत स्वतंत्रपणे काम करू शकलो. याशिवाय कानडी, हिंदी, कोंकणी आणि अंशत: इतर अनेक भाषांत ग्रंथप्रकाशनाचा थोडाफार प्रयत्न केला. परंतु प्रत्येक भाषेची सांस्कृतिक पार्श्वभूमी आणि ग्रंथप्रसाराची पद्धत वेगळी असते. त्यासाठी लागणारा चिवटपणा आमच्यात नव्हता. सांगायचा मुद्दा असा की जिद्दीने हे काम करणारे प्रकाशक जर देशाच्या अनेक केंद्रांत निर्माण झाले असते तर आज आहे त्याहून आपला भारत वेगळा दिसला असता.

बहुभाषिकत्वातून लक्षात येणारा दुसरा मुद्दा भाषांतरांचा. एके काळी जाणीवपूर्वक अनेक इंग्रजी किंवा इंग्रजीतून उपलब्ध असलेल्या ग्रंथांचे मराठीत भाषांतर होत असे. ज्ञानेश्वरांनी गीता मराठीतून सांगितली त्या प्रकारच्या प्रेरणेने हे काम आधुनिक काळात एकोणिसाव्या शतकात काही प्रमाणात झाले. भाषांतराबरोबर रूपांतर हाही प्रकार रुळला आणि त्यामुळे अनेक कथानके ही वाचकांपर्यंत पोचली. परंतु कलाकृती म्हणजे फक्त तिची कथा नव्हे. साने गुरुजींनी, उदाहरणार्थ, अनेक देशी आणि परदेशी अभिजात कलाकृती मराठी वाचकांपर्यंत पोचवल्या. त्यांचे ऋण मोठेच आहे. पण त्यांचा हेतू गोष्ट सांगणे हा होता, आणि त्यातून प्रबोधन. परंतु एकूण भाषांतर-रूपांतराकडे पाहावे त्या गंभीरपणे कधीच पाहिले गेले नाही. भाषांतर मूळ कलाकृतीतील प्रतिभेला किंवा वैचारिक ग्रंथ असल्यास त्यातील विचारांना न्याय देते की नाही हे तपासण्याची गरज कोणालाही भासली नाही. युरोपमध्ये ग्रीक नाटकांची आतापर्यंत चाळीस-पन्नास वेळा इंग्रजीत भाषांतरे झाली आहेत. अगदी बायबलचेही अधिकृत भाषांतराशिवाय अनेक अनुवाद होत असतात. भाषांतर कसे करावे याचा पुनर्विचार होत असतो. अलीकडच्या अशा टॉल्स्टॉय यांच्या लेखनाच्या बाबतीतही हे खरे आहे. आपल्याकडे मुळात एकदा भाषांतर होणे कठीण आणि ते तपासण्याचे किंवा सुधारण्याचे कोणी मनावर घेत नाही.

ही त्रुटी लक्षात घेता साने गुरुजी राष्ट्रीय स्मारकाने आंतरभारती अनुवाद सुविधा केंद्राची स्थापना केली. या संस्थेतर्फे काही कार्यशाळा घेतल्या गेल्या. 'मायमावशी'

हे षण्मासिक गेली काही वर्षे प्रसिद्ध होत आहे. विंदा करंदीकरांच्या प्रेरणेने दर वर्षी सर्वोत्कृष्ट मराठी अनुवादित पुस्तकाला बाळशास्त्री जांभेकर पुरस्कार दिला जातो. गंगाधर गाडगीळ अभ्यासवृत्ती देऊन तीन होतकरू भाषांतरकारांना ज्येष्ठ मार्गदर्शकांच्या सोबत काम करण्याची संधी देण्यात आली. परंतु हे सारे प्रयत्न तुटपुंजे ठरले. मुख्यत: अनुवाद झाल्यानंतर ते तपासण्याची प्रक्रिया कशी असू शकते हे शोधण्याचा प्रयत्न फारसा अर्थपूर्ण होऊ शकला नाही.

मराठीत 'कालिदासाच्या मेघदूता'चे अनेक अनुवाद झाले आहेत. ते बहुतेक श्रेष्ठ दर्जाच्या कवींनी केले आहेत. 'ज्ञानेश्वरी'चे इंग्रजीतच झालेले तीन अनुवाद माझ्या पाहण्यात आले आहेत. त्यांचा अभ्यास करून अनुवाद कसा कसा करता येतो याचा मागोवा घेणे आवश्यक आहे.

भाषांतराविषयी दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा : भाषांतर ज्या भाषेत व्हायचे त्या भाषेवर मातृभाषेसारखे प्रभुत्व असणे आवश्यक असते. मराठीच्या बाबतीत ही गोष्ट आजकाल दुर्मीळ होऊ पाहते आहे. पोशाखाच्या बाबतीत आपण जसे पाश्चात्त्य संस्कार पूर्णपणे स्वीकारले आहेत तसेच काहीसे भाषेच्या बाबतीत. तरीही उत्तम मराठी समजणारे आणि लिहिणारे अजूनही उपलब्ध आहेत असे आपण गृहीत धरू. ज्या भाषेतून भाषांतर करायचे आहे त्या भाषेचीही सूक्ष्म जाण असणे आवश्यक असते. या बाबतीत मराठीतील बरीचशी भाषांतरे मार खातात. गेल्या काही वर्षांत साहित्य अकादेमी आणि नॅशनल बुक ट्रस्ट या दिल्लीतील शासकीय संस्थांनी आणि महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने महाराष्ट्रात भाषांतराचे काम बऱ्याच प्रमाणात केले आहे. अनेकदा ही भाषांतरांची भाषांतरे असतात. म्हणजे तामिळमधून हिंदी आणि हिंदीतून मराठी, अशी. तत्त्वत: प्रत्येक अनुवादाला एक परीक्षक नेमलेला असतो. पण त्याच्याकडून पास-नापास पलीकडे कोणती अपेक्षा आहे ते स्पष्ट नसते. निदान दोन भारतीय भाषांत थेट भाषांतर होऊ शकेल अशी भूमी आपण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेच तयार करायला हवी होती. अजूनही विद्यापीठांनी इतर भाषा शिकवायला सुरुवात केली तर दहावीस वर्षांनी या प्रयत्नांना फळ येऊ शकेल. बंगालमध्ये रवींद्रनाथांनी 'विश्वभारती' आणि आपल्या साने गुरुजींनी 'आंतरभारती' ही संकल्पना मांडली. महात्मा गांधी भाषाकोविद नव्हते तरी त्यांनी निरनिराळ्या लिप्यांतील आठ भाषा थोड्याफार शिकून घेतल्या. मातृभाषा गुजराती, इंग्रजांशी व्यवहार करताना इंग्रजी, आणि इतर अनेक कारणांसाठी राष्ट्रभाषा यांत प्राविण्य मिळवले. त्यांच्या प्रभावाखाली इतर भाषाही शिकणारी बरीच प्रतिभावंत माणसे तयार झाली. परंतु हा जोम पुढे राहिला नाही. आज आसामी किंवा मल्याळी भाषेत काय चालू आहे याचा आपल्याला पत्ता लागतो तो फक्त ज्ञानपीठ पुरस्काराची घोषणा झाल्यावर.

या दोन्ही मुद्द्यांकडे दुर्लक्ष व्हायचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे आपली भाषा म्हणजे काय यासंबंधीच्या गैरसमजुती. काही राजकीय घडामोडींमुळे मराठी अस्मितेला अमाप महत्त्व आले. गेल्या शतकात इंग्रजीमध्ये ऑक्सफर्ड इंग्लिश ही खरी इंग्रजी भाषा आणि इतर देशांत आणि समाजांत बोलली जाणारी इंग्रजी ही चुकीची अर्धीकच्ची बोली अशी समजूत होती. हळूहळू सृजनशील साहित्यात बोली भाषांतील शब्द सर्रास येऊ लागले. स्लँगलाही भाषिक महत्त्व येऊ लगले, भौगोलिक अंतर आणि लोकांतील संकर यांमुळे अमेरिकन इंग्लिश, आफ्रिकन इंग्लिश, ऑस्ट्रेलियन इंग्लिश, अगदी इंडियन इंग्लिशसुद्धा निरनिराळ्या प्रकारे जोम धरू लागली. हळूहळू त्यांचा स्वीकार विद्यापीठांतदेखील होऊ लागला.

ही भूमिका मराठी भाषेच्या बाबतीत घ्यायला आपल्याला वेळ लागतो आहे. बराच काळ पुणेरी मराठी ही प्रमाण भाषा आणि सातारा, नागपूर किंवा कोकण इथे बोलली जाणारी ही अशुद्ध मराठी मानली जायची. तसे पाहिले तर भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी याची जाणीव श्री०म० माटे यांच्या सारख्यांनी करून दिली होती. तरीही पुणेरी पीळ सैल होत नव्हता. ग्रामीण साहित्य आणि दलित साहित्य यांनी, विशेषत: स्वातंत्र्योत्तर काळात, उसळी घेतली; तशी भाषेची नवीन रूपे दिसू लागली.

प्रकाशक म्हणून माझे दोन अनुभव सांगण्यासारखे आहेत. नारायण महाडिक यांचे आत्मचरित्र 'कैदी नंबर ३१४६७' माझ्याकडे ज्योत्स्ना देवधर यांचेमार्फत आले. महाडिकांनी खुनाच्या आरोपावरून बरीच शिक्षा भोगली होती, पुढे त्यांचे निर्दोषत्व सिद्ध झाले. त्या आत्मचरित्रात त्यांनी आपले अनुभव सांगताना काही अप्रचलित शब्द प्रभावीपणे वापरले होते. ते हस्तलिखित मी आधी एका पुण्याच्या साप्ताहिकात पूर्वप्रसिद्धीसाठी दिले. त्यांनी त्यातील रांगड्या भाषेचे शुद्धीकरण केले. सुदैवाने त्यांची मूळ प्रत हाती आल्यामुळे मी पुस्तक मुळाबरहुकूम छापू शकलो.

उद्धव ज० शेळके यांची 'धग' ही कादंबरी प्रकाशन होताच एक अभिजात कलाकृती म्हणून मानली गेली. त्यांत वऱ्हाडी बोली वापरल्यामुळे त्या कथनातील वास्तव अधिक प्रभावीपणे जाणवत होते. कोणीतरी अमरावतीकरांनी लेखकाला भरीस पाडले की ही कादंबरी प्रमाण भाषेत छापल्यास मुंबई-पुण्याकडे अधिक मान्यता पावेल. बिचाऱ्या लेखकाने संपूर्ण कादंबरीचे पुनर्लेखन केले. त्या प्रकारात मूळ लेखनाचा गाभाच हरवला जात होता. मी कधी नव्हे ते प्रकाशक म्हणून लेखकाच्या सूचना नाकारून ती कादंबरी वाचवली.

प्रश्न फक्त त्या त्या साहित्यकृतीचा नाही तर एकूण भाषेकडे पाहण्याचा आहे. माटे यांनी निर्देश केल्याप्रमाणे भाषा जशी निरनिराळ्या व्यवसायांतून आलेल्या शब्दसंपत्तीतून समृद्ध होत जाते तशीच नवीन अनुभव आणि बोली भाषा यांतून होत

असते, प्रमाणीकरणातून नव्हे. भाषा समृद्ध व्हायची तर शब्दसंपत्ती वाढायला हवी. त्यासाठी आपल्या दारे-खिडक्या उघडल्या पाहिजेत. मराठी भाषेत इंग्रजी, हिंदी, उर्दू शब्द समाविष्ट झाले, याचे कौतुक न मानता आपण ती घुसखोरी किंवा अत्याचार समजतो. वास्तविक भौगोलिक दृष्ट्या मराठी प्रदेशाची कोकणी, कानडी, गुजराती, तेलगू भाषांशी सलगता आहे. एके काळी तर मुंबई इलाखा कानडी, गुजराती, मराठी आणि सिंधी सुद्धा भाषकांनी व्यापलेला होता. शिवाय हिंदी, इंग्रजी भाषांशी बहुतेकांचा परिचय आहेच. तेव्हा या सर्व भाषांतील शब्दांचे स्वागत करण्याची आपली मानसिकता हवी होती. संस्कृत ही सर्व भाषांची जननी असेल तर सर्व भाषांशी आपले मावसनाते असायला हवे. उलट संस्कृत भाषेचे एका अर्थी आपण बंधन बनवले. भाषावृद्धीऐवजी भाषाशुद्धीचे स्तोम माजवले. संस्कृतमधील मराठी भाषेत आलेले तत्सम किंवा तद्भव शब्द म्हणजेच खरी शुद्ध मराठी हा आग्रह काहींनी धरला. विनायक दामोदर सावरकर यांनी मुद्दाम तयार केलेले काही शब्द मराठीत रुळले आणि त्या प्रमाणात भाषा समृद्ध झाली, हे खरे. तरी स्वातंत्र्यानंतर डॉ० रघुवीर यांच्या प्रभावाखाली ही भूमिका हास्यास्पद होण्याइतकी ताणली गेली. एकूण ही संस्कृतची बेडी भाषेसाठी उपकारक नव्हे तर बंधनकारक ठरली.

हा अट्टाहास कसा मारक ठरतो याचे एक सोपे उदाहरण : मराठीतील एक श्रेष्ठ लेखक आणि शिक्षणतज्ज्ञ आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांनी अनेक वर्षांपूर्वी आपल्या पाठ्यपुस्तकात 'दिनूचे बिल' ही कथा लिहिली. 'बिल' हा शब्द मराठी का नाही मानायचा? देयक हा शब्द कठीण नसेल; परंतु सर्वसाधारणपणे बिल हाच शब्द बहुतेकांच्या तोंडी असतो तरी आपल्या शासकीय कामात देयक हा आग्रहाने वापरला जातो. वास्तविक कप, टेबल, ब्रेक, फॅन असे कितीतरी शब्द आपले झाले आहेत. या भूमिकेने आपण भाषा वाढू दिली तर प्रादेशिक भाषा, बोली आणि इतर भाषा यांच्या संकराने - संकटाने नव्हे - मराठी भाषा ही आजच्यापेक्षा अधिक शब्दसमृद्ध होऊ शकेल.

शब्दांवरून लक्षात येणारी एक महत्त्वाची गोष्ट, आपले भाषाशास्त्रज्ञ आणि आम्ही प्रकाशक यांनी न केलेली. शब्दकोश हा भाषेचा कणा. आपण डिक्शनरी या शब्दाचा अर्थ जणू इंग्रजी-मराठी शब्दकोश असा केला आहे. मराठीत ज्ञानकोशांची संख्या त्या मानाने बरी आहे. ज्ञानकोशकार केतकरांपासून सुरू झालेली परंपरा काही प्रमाणात चालू राहिली. तरीही आपली लोकसंख्या आणि शिक्षणाचा वाढता प्रसार, त्याचप्रमाणे जागतिक स्तरावर ज्ञानशाखांतील बेसुमार वाढ लक्षात घेता ती तोकडीच आहे. इतर संदर्भग्रंथ तयार करण्याकडे आपण फारसे लक्ष दिले नाही. संदर्भग्रंथांची निर्मिती जशी महत्त्वाची त्याचप्रमाणे त्यांचा उपयोग करण्याची सवय.

मराठीत एकभाषिक म्हणजेच मराठी - मराठी असे कितीसे शब्दकोश आहेत? कसोशीने शोधले तर फक्त दोन्ही हातांच्या बोटांवर मोजण्याइतके. इंग्रजीत फक्त ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस नव्हे तर एकेका प्रकाशकाने निरनिराळ्या पद्धतीचे कोश तयार केलेले आहेत. शब्दकोशांची पुढील पायरी म्हणी-वाक्प्रचार, शब्दांचा योग्य उपयोग आणि दुरुपयोग, समानार्थी आणि विरुद्ध अर्थ असलेल्या शब्दांचे कोश अशा कितीतरी साधनांची आवश्यकता आहे. आपल्या मराठीतदेखील प्रदेशाच्या कानाकोपऱ्यात वापरल्या जाणाऱ्या शब्दांची जरी नोंद झाली तर एक विस्तृत पट तयार होईल. आज कम्प्युटर टेक्नॉलॉजीच्या साहाय्याने ऑनलाइन शब्दकोश करणे तंत्रदृष्ट्या शक्य आहे. मी मुद्दामच कम्प्युटर टेक्नॉलॉजी हे परकीय समजले जाणारे शब्द वापरले आहेत. कम्प्युटरचे तंत्रज्ञान गेल्या काही दशकांत विकसित झाले. इंग्रजी भाषेत देखील फाइल, सेव, सर्च इत्यादी शब्दांना कम्प्युटरच्या संदर्भात विशिष्ट अर्थ आहे. कम्प्युटर हेच मुळी भाषेपलीकडे दुवे जोडण्याचे साधन आहे. अशा विषयांत आपण संगणक, वाचवा, शोधा, इत्यादी शब्द तयार करण्यात काय हशील आहे. कम्प्युटर वापरणारे फक्त मराठीतून काम करणार नाहीत काही! तेव्हा ही संपूर्ण शब्दसंपत्ती आपण तशीच स्वीकारली पाहिजे. फिजिक्स, केमिस्ट्रीसारख्या, ज्यांना भाषेपलीकडील किंवा 'लँग्वेज न्यूट्रल' म्हणता येईल, अशा विषयांच्या बाबतीतही तेच लागू आहे.

संदर्भग्रंथ-दालनात शुद्धलेखनाचे महत्त्व वेगळे सांगायला नको. अनेक वर्षे आपले शुद्धलेखन हे व्याकरणाशी आणि उगम भाषेशी जोडलेले होते. संस्कृत भाषा ही अत्यंत प्रगल्भ भाषा खरी; परंतु कदाचित त्याच कारणाने सामान्य जनतेपासून दूर गेलेली. आज हजारांहून कमी लोक संस्कृत आपली मातृभाषा मानतात आणि तिच्यात दैनंदिन व्यवहार करू शकतात. उपलब्ध संस्कृत नाटकांतही सर्व पात्रे संस्कृत बोलत नाहीत. संस्कृतशी जोडलेले शुद्धलेखन हे प्राध्यापकांनाही कठीण जायचे. १९६२ पासून महामंडळाच्या नियमांचा स्वीकार झाल्याने हा प्रश्न बराचसा सुलभ झाला. तरीही आज शुद्धलेखन हा विषय कच्चाच राहिलेला आहे. य०ए० धायगुडे, मो०रा० वाळंबे, यास्मीन शेख, द०न० गोखले अशा काहींनी यात केलेले काम उल्लेखनीय आहे. अलीकडे अरुण फडके यांनी केलेल्या शुद्धलेखनावरील कामाचे महत्त्व अपार आहे.

शब्दकोश आणि लेखनकोश हे रोज लागणारे संदर्भ. त्या मानाने ग्रंथमुद्रणाला लागणारे मार्गदर्शन हे नैमित्तिक असते. परंतु उत्तम ग्रंथनिर्मितीचे सांस्कृतिक महत्त्व लक्षात घेता शुद्धलेखनापासून ते मांडणी, दर्शन, रचना या साऱ्या गोष्टी काटेकोरपणे सांभाळणे आवश्यक आहे. इंग्रजीत यासाठी अनेक संस्थांनी आपल्या स्वत:च्या कर्मचाऱ्यांसाठी तयार केलेली स्टाइल मॅन्युएल्स पुढे इतर अनेकांनी वापरली. सर्वांना एकच नियम हे यामागील तत्त्व नाही तर प्रत्येक घटकांसंबंधी काही विचार ठामपणे

केलेला असणे आवश्यक मानले गेले आहे.

मराठीत या प्रश्नाचा कधी विचार झालेला दिसत नाही. पॉप्युलर प्रकाशन १९२५ पासून इंग्रजीत पुस्तके प्रकाशित करत आली. त्यांत विद्यापीठासाठीची क्रमिक पुस्तके होती; तसेच देशपरदेशात वापरायचे संदर्भग्रंथही होते. अनेक उत्तम मुद्रक-संपादकांबरोबर काम केल्यामुळे आम्हीही विशेषत: 'शिकागो मॅन्युअल ऑफ स्टाइल'चा उपयोग नियमितपणे करू लागलो. मराठी पुस्तकांची सुरुवातीची पाने पाहिली तर क्रम कोणता असावा हे उलटसुलट दिसायचे. अगदी साध्या साध्या गोष्टींकडे आपण मराठीत किती दुर्लक्ष करतो हे लक्षात येऊ लागले. मग आम्ही शक्यतो या मॅन्युअलच्या साहाय्याने मराठीतही काहीतरी पद्धत किंवा रीती स्थापनाचा प्रयत्न करू लागलो. माझ्या सहकाऱ्यांनीही या प्रयत्नांत साथ दिली. कृष्णा करवार आणि मोहन शिराली हे हाडाचे मुद्रक. त्यांनाही इंग्रजी पुस्तकांच्या मुद्रणाचा भरपूर अनुभव होता. कर्नाटक प्रेसचे सोन्याबापू ढवळे, मौज प्रिंटिंग ब्यूरोचे विष्णुपंत भागवत, इंडिया प्रिंटिंग वर्क्सचे विसूभाऊ लिमये हे श्रेष्ठ दर्जाचे मुद्रक होते. द०ग० गोडसे हे चित्रकार लंडनमध्ये प्रशिक्षित आणि मातबर संस्थांचा अनुभव असलेले. या सर्वांचे आमच्यावर संस्कार होते. २०१२ साली आमच्या मराठी विभागाला साठ वर्षे पूर्ण होणार होती. मूळ संस्थेचा तर त्याहून अधिक दोन दशकांचा अनुभव होता. तो जमेस धरून आपण मराठीत स्टाइल बुक तयार करावे असे ठरवले. माझी पहिली संपादक मृदुला जोशी हिचा अनुभव आणि वृत्ती या कामाला अत्यंत योग्य होती. तेव्हा तिच्या मदतीने या 'पॉप्युलर रीतिपुस्तका'चे लेखन केले. तिच्यावर सत्त्वशीला सामंतसारख्या भाषाशास्त्रज्ञांचा संस्कार होता. सत्त्वशीलाबाईंच्या स्मारक व्याख्यानात 'पॉप्युलर रीतिपुस्तका'ची ओळख यापूर्वी मृदुलाने करून दिली आहेच. मी फक्त यासंबंधी दोन गोष्टींचा उल्लेख करणार आहे.

या रीतिपुस्तकात सुचवलेले नियम हे निव्वळ मार्गदर्शनपर आहेत. आवश्यकतेनुसार यात बदल अवश्य होऊ शकतो. परंतु जाणीवपूर्वक बदल करायचा नसल्यास काय करता येईल यासंबंधीचे हे दिग्दर्शन आहे. दुसरी गोष्ट अशी की या प्रकारची रीतिपुस्तके आपापल्या अनुभवानुसार अनेकांनी तयार केली पाहिजेत. आम्हा दोघांनाही नवीन डिजिटल तंत्रज्ञानाचा अनुभव नव्हता. बदलते तंत्रज्ञान, निरनिराळ्या प्रकारच्या पुस्तकांच्या निर्मितीचा अनुभव, बदलती रुची या सर्वांमुळे त्यांत फरक असणे आवश्यक आहे.

पॉप्युलरने शालेय क्रमिक पुस्तकांचे प्रकाशन टाळले. तेव्हा त्या क्षेत्राचा अनुभव आम्हाला नाही. त्याचप्रमाणे पोथ्यांसारख्या धार्मिक पुस्तकांचाही. पॉप्युलरचा नवसाहित्याशी निकटचा संबंध आल्यामुळे नवीन शुद्धलेखन आणि नवीन आधुनिक सौंदर्यदृष्टी यांचा आमच्यावर पगडा होता. हा आमच्या रीतिपुस्तकाचा आधार आणि मर्यादाही तीच. गेल्या वर्षी मृदुला जोशी यांनी सत्त्वशीला सामंत व्याख्यानात सर्व

तपशील आपल्याला दिलाच आहे. तेव्हा मी ते आता टाळतो.

प्रा० प्र०ना० परांजपे यांनी मी अॅकेडेमिक पब्लिशिंग, विशेषत: अभ्यासपूर्ण नियतकालिकांचे प्रकाशन, याविषयी माझे अनुभव आणि विचार सांगावेत अशी इच्छा प्रदर्शित केली. या विषयात माझा वैयक्तिक अनुभव तोकडा आहे आणि तो फारसा यशस्वी नाही. तरीही जितके काही सांगण्यासारखे आहे ते मी सांगत आहे.

अभ्यासू पुस्तकांत क्रमिक पुस्तकांचे प्रकाशन हा फायदा-तोट्याचा विचार करायला लावणारा विभाग आहे. शालेय क्रमिक पुस्तके यांना शासनाने मान्यता द्यावी लागते. त्यासाठीचे हिशेब फार वेगळे असतात. आधीपासूनच पॉप्युलरने हे इतरांवर अवलंबून असलेले आणि म्हटले तर भ्रष्टाचारी दालन टाळले. कॉलेज आणि विद्यापीठे यांच्यासाठीची क्रमिक पुस्तके ही जर विद्यार्थ्यांना पसंत पडली तर कोणाचीही शिफारस आवश्यक नसते, असा आमचा अनुभव आहे. सामाजिक शास्त्रे, भौतिक शास्त्रे आणि विशेषत: वैद्यकीय पुस्तके यांच्या प्रकाशनांचा मार्ग आम्ही चोखाळला. पुस्तकांचा दर्जा सांभाळत आमची काही पुस्तके यशस्वी झाली. आणि खरेतर आम्ही दीर्घकाळ या व्यवसायात तग धरून राहिलो ते मुख्यत: या काही क्रमिक पुस्तकांच्या यशामुळे.

क्रमिक पुस्तकांखेरीज अभ्यासपूर्ण पुस्तके निदान आपल्या देशात किफायतशीर ठरतात असा अनुभव नाही. इंग्रजीतून प्रसिद्ध होणारी अत्यंत गहन विषयांवरील पुस्तके जगभर आवश्यक असतात म्हणून ती निदान तोट्याची ठरत नसावीत. तरीसुद्धा या प्रकारचे प्रकाशन परदेशात देखील बव्हंशी युनिव्हर्सिटी प्रेस करतात. त्यांना निरनिराळ्या कारणांनी फायदातोट्याचा विचार करावा लागत नाही. व्यावसायिक प्रकाशकांनीही अमेरिका, इंग्लंड आणि युरोप या देशांत अशा प्रकारचे प्रकाशन करताना ते यशस्वी कसे करावे, याचा क्लृप्त्या शोधून काढल्या आहेत. रशिया आणि पूर्व यूरोपमधील देश यांनी तंत्रज्ञानात आणि शास्त्रीय विषयांत प्रगती केली. ते बरेचसे संशोधन हे त्या त्या देशाच्या भाषेत प्रसिद्ध होत असे. पर्गमन प्रेस या संस्थेने हे सारे इंग्रजीतून प्रकाशित करण्याचा उपक्रम यशस्वी ठरला. नेदरलॅंड्समध्ये महागड्या किमतींना पुस्तके प्रसिद्ध करणाऱ्या काही छोट्या कंपन्या होत्या. अनेकांना शासकीय किंवा संस्थात्मक अनुदानांचा आधार असायचा.

आपल्या देशातील विद्यापीठांनी ही जबाबदारी टाळलेली दिसते. त्यांनी जे थोडेफार प्रकाशन केले ते क्रमिक पुस्तकांच्या क्षेत्रात. किंबहुना आधीच्या समाजवादी उद्घोषाच्या काळात आणि नंतर उदारीकरणाचा उदो उदो करत असतानाही क्रमिक पुस्तकांचे हुकमी क्षेत्र शासनाने आणि इतर शासकीय यंत्रणांनी जखडून ठेवले. अभ्यासपूर्ण पुस्तकांचे प्रकाशन ही जबाबदारी व्यावसायिक प्रकाशकांनीच उचलली. दिल्ली हे भारत सरकारचे केंद्र म्हणून अनेक फंडिंग एजन्सीज् तिथेच केंद्रीभूत झालेल्या; म्हणून असेल,

हे प्रकाशन बहुतांशी दिल्लीहून होऊ लागले. आमचा मुंबई विद्यापीठातील प्राध्यापकांशी संबंध येत राहिला. त्यामुळे असेल, माझ्या वडिलांच्या काळापासून पॉप्युलरने अनेक अभ्यासपूर्ण पुस्तके नफातोट्याचा विचार न करता प्रसिद्ध केली. त्यापैकी काही नंतर अभ्यासक्रमात स्वीकारली गेली. उदा. प्राध्यापक घुर्ये यांची समाजशास्त्रावरील पुस्तके.

एक महत्त्वाचा प्रश्न हा अभ्यासपूर्ण नियतकालिकांच्या प्रकाशनाचा. व्यवसाय म्हणून तो यशस्वी करणारे प्रकाशक परदेशात आहेत. अमेरिकेत 'मॅकग्रॉहिल' या संस्थेची स्वत:ची गगनचुंबी इमारत होती. त्यातील ४०एक मजल्यांपैकी बहुतेक जर्नल-प्रकाशनाच्या विभागाने व्यापलेले होते. पुस्तक प्रकाशन हा त्या मानाने लहानसा विभाग असे मी ऐकून होतो. या नियतकालिकांत शास्त्र आणि तंत्रज्ञान यांच्यावरील जर्नलांचा भरणा अधिक होता. त्यांना जगभर मागणी असायची, त्यांची वर्गणीही भरपूर असायची आणि त्यांत जाहिरातीही असायच्या. मी भूतकाळ वापरतो आहे; कारण गेल्या काही वर्षांत कम्प्युटरमुळे जे तंत्रज्ञानात बदल घडले आहेत, त्यामुळे यात काही बदल झाले असल्यास मला माहीत नाही.

या कशाचाही आपल्या देशावर फारसा परिणाम झालेला दिसत नाही. काही विशिष्ट क्षेत्रांत ज्या जर्नल्सना व्यावहारिक महत्त्व आहे अशांचे प्रकाशन शक्य वाटत होते. परंतु कोणतेही नियतकालिक हे प्रामुख्याने जाहिरातींच्या उत्पन्नावर चालू राहते.

आम्हाला एका नियतकालिकाचा अनुभव प्रत्यक्ष मिळाला. 'इंडियन जर्नल ऑफ सर्जरी' हे असोसिएशनचे मुखपत्र. मध्यंतरी डॉ०पी०के० सेन आणि त्यांचे सहकारी यांनी हे एक जागतिक स्तरावरील नियतकालिक व्हावे असे ठरवले. डॉक्टर सेन यांनी स्वत: भारतातले पहिले हृदय-प्रत्यारोपण के०ई०एम० हॉस्पिटलमध्ये केले. संपादकीय पातळीवर त्यांनी उत्तम कामगिरी केली. त्याला साजेसे निर्मितीमूल्य आम्ही उभे केले. त्या जर्नलच्या प्रती असोसिएशनच्या सभासदांना अल्प किमतीत पाठवायच्या होत्या. तेव्हा मुख्य उत्पन्न हे जाहिरातीचे. बहुतेक औषध कंपन्यांची स्वत:ची प्रसिद्धी खाती जबरदस्त असतात. जाहिराती या त्या संपादकांना खूश ठेवण्याचा मार्ग. या जर्नलच्या संपादक मंडळात काही भांडणे होती. त्यांच्या आग्रहाशिवाय जाहिरातीचा ओघ चालू राहणे शक्य नव्हते. तीनचार वर्षांत बराचसा तोटा सहन करून आम्ही यातून सुटका करून घेतली.

इतर दोन अभ्यासपूर्ण जर्नल्स आम्ही काही काळ प्रसिद्ध केली ती त्यांच्या मर्यादा स्वीकारून, निव्वळ कर्तव्यभावनेने. 'इंडियन जर्नल ऑफ फिलॉसाफी'चे संपादक प्राध्यापक जे०डी० स्वामिदासन यांच्या सोबतीने काही अंक निघाले, ते खरोखर उत्तम होते. वर्षांतून तीनच अंक; तेव्हा त्यांचा खर्च झेपण्यासारखा होता. परंतु या अव्यावहारिक कामासाठी आमच्या संस्थेतील मंडळींना उत्साह वाटेना. प्रा० जी०व्ही०

देवस्थळी संपादित 'इंडियन अँटिक्वेरी थर्ड सीरिज्'च्या मुद्रणासाठी तेव्हाच्या लेटरप्रेस मुद्रणपद्धतीत अडचणी येऊ लागल्या.

माझे बंधू सदानंद आणि आमचे ज्येष्ठ मित्र प्रभाकर पाध्ये यांनी 'इंडियन रायटिंग टुडे'चे अठरा अंक प्रसिद्ध केले. या प्रकाशनाला एका संस्थेचे पाठबळ होते. तेव्हा अडचण आर्थिक नव्हती. या अंकांत भारतातील निरनिराळ्या भाषांतील साहित्य प्रवाहांसंबंधीचे लेख मुद्दाम लिहवून घेतले जात. हे काम कठीण असले तरी संपादकद्वय ते कसोशीने करत असे. त्यांचा निरुत्साह हा फार वेगळ्या कारणांनी झाला. हे लेख इतर भाषकांनी वाचावेत आणि त्यामुळे भाषा-भगिनींत देवघेव वाढावी हा मुख्य हेतू होता. त्यांना अनुभव असा आला की प्रत्येक जण फक्त आपल्या भाषेसंबंधीचा लेख वाचून त्यातील त्रुटी शोधून काढे म्हणजे मुख्य हेतू बाजूला राहत असे.

थोडक्यात ॲकॅडेमिक पब्लिशिंगने जोर धरायला फक्त आर्थिक अडचणी नाहीत. त्यासाठी लागणारी सामाजिक आणि बौद्धिक पार्श्वभूमीही तयार करावी लागते. मध्यंतरी त्रिगुण सेन हे भारत सरकारमध्ये शिक्षणमंत्री असताना प्रत्येक राज्याला आपापल्या भाषेत क्रमिक पुस्तके तयार करण्यास अनुदान दिले गेले. बरीचशी पुस्तके लिहिली गेली. त्यांतील थोडीशीच प्रसिद्ध झाली. त्यांतीलही थोडी प्रत्यक्ष वापरली गेली. बाकी काहींना अच्छे दिन येण्यापर्लीकडे फारसे काही साधले नाही.

हा विषय फार मोठा आहे. व्यक्तिश: मला दीर्घकाळ प्रकाशनक्षेत्राचा अनुभव मिळाला हे जसे खरे तसेच माझ्या अनुभवांना आणि समजशक्तीला मर्यादा आहेत हेही तितकेच खरे. आज या व्याख्यानाच्या निमित्ताने माझे काही विचार आपल्यापुढे मांडण्याची संधी आपण दिली याबद्दल मी मराठी अभ्यास परिषदेचा ऋणाईत आहे. ■

[ १ मे २०१६ या मराठी अभ्यास परिषदेच्या वर्धापन-दिनी दिलेले व्याख्यान ]

चलभाष : 9820871408

## स्वागत

- **शून्य एक मी** (कवितासंग्रह) / पी. विठ्ठल
  कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, मार्च २०१७, पृष्ठे १२८, किंमत रु. १५०
- **गीताञ्जलि**
  आशय परिवार, सोलापूर, २३ एप्रिल २०१७ (खासगी वितरणासाठी)
- **कालिदास आणि शाकुन्तल** / त्र्यं. वि. सरदेशमुख
  सुविद्या प्रकाशन, सोलापूर, जून २०१४, पृष्ठे ६८, किंमत रु. ७०





अनुक्रमणिका

# मराठीसाठी नुक्ता (अधोबिंदू)

- अरुण फडके

'अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ' या संस्थेने १९६२ साली शुद्धलेखनाचे नियम केले. या नियमांमध्ये काही बदल करण्यासाठी या संस्थेने २००८ सालापासून प्रयत्नांना सुरुवात केली. त्या वेळी त्यांनी काही निवडक व्यक्तींना दहा प्रश्नांची एक प्रश्नावली पाठवली. त्या प्रश्नावलीत संस्थेने 'मराठीत नुक्ता पुन्हा आणावा का?' अशा आशयाचा प्रश्न विचारलेला आहे. त्याचप्रमाणे, दिनांक ६ नोव्हेंबर २००९ रोजी महाराष्ट्र शासनाने वर्णमाला आदेश काढला. त्यातील वर्णमालेच्या तक्त्यात 'अतिरिक्त चिन्हे' या मथळ्याखाली नुक्त्याचे चिन्ह दाखवले असून त्याला 'अधोबिंदू' असे म्हटलेले आहे. पुढे 'लेखनविषयक विशेष सूचना' या मथळ्याखाली अशी सूचना दिली आहे की, '' 'च' व 'झ' या व्यंजनांचे दंततालव्य आणि तालव्य उच्चार दर्शविण्यासाठी अधोबिंदू (नुक्ता) देण्याची गरज नाही. परंतु शब्दकोशामध्ये व इतरत्र स्वतंत्रपणे जर उच्चारभेद कंसांत दाखवायचे असतील तर अधोबिंदूचा वापर करावा.'' या सूचनेत 'ज' या व्यंजनाचा उल्लेख करायचा राहिला असला, तरी उच्चारभेद दाखवण्यासाठी नुक्त्याची गरज शासनानेही मान्य केल्याचे दिसते.

अशा प्रकारे उच्चारभेद दर्शवणाऱ्या चिन्हांना इंग्लिशमध्ये 'डायक्रिटिकल मार्क्स्' आणि मराठीत 'उच्चारभेददर्शक चिन्हे' म्हणतात. सारख्याच दिसणाऱ्या दोन अक्षरांमध्ये असलेला उच्चारभेद दाखवण्याकरता त्यातल्या एका अक्षरासाठी अशा चिन्हाचा वापर केला जातो. खरेतर मराठीत सध्या आपण असे एक चिन्ह वापरतो. 'तंग' या शब्दात 'त'वर असलेल्या टिंबाला आपण अनुस्वार म्हणतो. परंतु आता पुढील दोन शब्दप्रयोग पाहा- 'समुद्राचा तळ', 'सुंदर तळं'. यांमध्ये 'तळ-तळं' या शब्दांच्या अंत्य अक्षराच्या उच्चारांमध्ये भेद आहे आणि तो आपण एका टिंबाने दाखवतो. परंतु या संदर्भात या टिंबाला अनुस्वार न म्हणता 'शिरोबिंदू' किंवा 'शीर्षबिंदू' असे म्हणायचे असते. या प्रकारच्या उच्चारभेदासाठी वेगळे चिन्ह निर्माण न करता आपण 'टिंब' या एकाच चिन्हावर 'अनुस्वार' आणि 'शीर्षबिंदू' अशी दोन कामे सोपवली आहेत. परंतु लेखनात काहीतरी भेद दिसल्यामुळे वाचताना उच्चारभेद करण्याची सूचना आपल्याला मिळते. मात्र 'च', 'ज', 'झ' या वर्णांचे दोन उच्चार दाखवण्यासाठी यांच्या लेखनात कोणताही भेद केला जात नसल्यामुळे कोणता उच्चार केव्हा करायचा असा प्रश्न पडतो, ही अडचण प्रामाणिक आहे.

मराठीचे आद्य व्याकरणकार मोरो केशव दामले यांनीही त्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथातल्या 'वर्णांचे वर्गीकरण' या अध्यायात 'दंततालव्य' या मथळ्याखाली 'च, ज, झ' ही व्यंजने दाखवली असून पुढे 'हा उच्चार निव्वळ मराठी आहे,' अशी टीप घातली आहे. यावरून 'च,ज,झ' या व्यंजनांचा दंततालव्य उच्चार संस्कृतात होतच नाही हे दिसते. म्हणूनच उच्चारानुसार केलेली व्यंजनांची ही वर्गवारी केवळ संस्कृतचे उच्चारण लक्षात घेऊन केली गेली आहे, असे म्हणता येते. मराठीत मात्र 'चकोट'पासून 'च्यावम्याव'पर्यंत, 'जंजाळ'पासून 'ज्वारी'पर्यंत आणि 'झकपक'पासून 'झेलणे'पर्यंत सर्व शब्दांचा उच्चारारंभ 'तालव्य' असलेले अनेक शब्द जसे आहेत; तसेच 'चकणा'पासून 'चौसष्ट'पर्यंत, 'जकात'पासून 'जोहार'पर्यंत आणि 'झगडा'पासून 'झोळी'पर्यंत सर्व शब्दांचा उच्चारारंभ 'दंततालव्य' असलेलेही अनेक शब्द आहेत. त्याचप्रमाणे 'अचाट'पासून 'सूचना'पर्यंत दुसऱ्या स्थानावर तालव्य उच्चार असलेले अनेक शब्द जसे आहेत, तसेच 'अचरट'पासून 'सुचणे'पर्यंत दुसऱ्या स्थानावर दंततालव्य उच्चार असलेलेही अनेक शब्द आहेत. उच्चारभेददर्शक अशी ही शब्दसंख्या केवळ अपवादात्मक नसून तिचे प्रमाण खूप आहे. म्हणूनच मराठीतला हा उच्चारभेद लक्षात घेऊन लेखनातही तो दाखवण्यासाठी वेगळ्या चिन्हाची गरज रास्त ठरते.

या नुक्त्याचा संबंध शब्दांच्या सामान्यरूपांशीही येतो. महामंडळाच्या शुद्धलेखन नियमांतील एक नियम असे सांगतो की, जाकारान्त पुल्लिंगी नामांची सामान्यरूपे जाकारान्तच ठेवावीत, ज्याकारान्त करू नयेत. वास्तविक पाहता मराठीत काही मोजके अपवाद सोडता आकारान्त पुल्लिंगी नामांची सामान्यरूपे याकारान्त होतात; जसे- घोडा-घोड्याला. परंतु या नियमानुसार 'आजा, मोजा, राजा, सांजा' यांसारख्या दंततालव्य आकारान्त पुल्लिंगी नामांची सामान्यरूपे 'आजाला, मोजात, राजाला, सांजाच्या' अशी जाकारान्तच ठेवावी लागतात. मात्र या सर्व सामान्यरूपांचे उच्चार तालव्य आकारान्त होतात. त्यामुळे दंततालव्य ते तालव्य असा उच्चारात होणारा विकार हेच सामान्यरूप मानले आहे, म्हणून लेखनात हा फरक आपण दाखवत नाही; परंतु त्यामुळे उच्चारात फरक करायचा आहे हे दाखवले जात नाही. नुक्त्याचा वापर केला, तर हे शब्द त्यांच्या मूळ रूपात लिहिताना नुक्तायुक्त जाकारान्त लिहिले जातील, आणि सामान्यरूपांमध्ये विनानुक्ता जाकारान्त लिहिले जातील. त्यामुळे हे लेखन अनुक्रमे दंततालव्य आणि तालव्य अशा उच्चारभेदाचे निदर्शन करेल.

■

[ लोकसत्ता, 'लोकरंग' पुरवणी २१ ऑगस्ट २०१६ ]





अनुक्रमणिका

# तुकारामांच्या जाणिवेतून 'कवित्वाची स्थिती' : बहुभाषिक दृष्टिकोन

- गिरिषा टिळक

मराठी भाषेमधल्या श्रेष्ठ कवींमध्ये कवी म्हणून तुकारामांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. कवीची काव्यप्रतिभा आणि संतांचा जगाकडे बघण्याचा पारदर्शक दृष्टिकोन यांचा सुंदर मिलाफ म्हणजेच तुकारामांचे काव्य. व्यक्तिमत्त्वातील कवी आणि संत या दोन्ही बाजू जेव्हा समतल विचारांनी प्रकट होतात तेव्हा काव्य एका वेगळ्याच उंचीवर जाते. काव्यातील नैतिक मूल्ये आणि आध्यात्मिक महती यांची ठाशीव बैठक सामान्य माणसालाही विचार करायला प्रवृत्त करते. तुकाराम स्वत:ला मूलत: कवी समजतात. त्यांनी स्पष्टपणे कवित्वाच्या स्थितीबाबत, कवीच्या जबाबदाऱ्यांबाबत आपले म्हणणे मांडले आहे. काव्य लिहिण्याचे ते स्वत: एक माध्यम आहेत, यावर त्यांचा विश्वास होता. ते लिहितात, ''तुका म्हणे मज बोलवितो देव''. तुकारामांच्या अभंगांचे भाषांतर करताना दिलीप चित्रे म्हणतात, की ''निव्वळ शब्दांचा अनुवाद करून तुकारामांच्या काव्याचे भाषांतर होत नाही. ते करताना सलगी असलेल्या शैलीचा पुनर्विचार करावा लागतो.'' चित्रे यांनी भाषांतरीत केलेले तुकारामांचे अभंग जेव्हा लोथार लुट्झ जर्मन भाषेत भाषांतरीत करतात तेव्हा ते म्हणतात, की ''मराठी व इंग्रजी या भाषा, तुकारामांच्या अभंगांच्या दोन बाजू मांडतात. तुकाराम हे भारतीय असून स्थानिक प्रथांमधील अणूरेणूंनी त्यांचे जीवन व्यापलेले आहे, त्याच वेळेला जागतिक पातळीवरही त्यांची ओळख आहे.'' दिलीप चित्रे यांचे तुकारामांच्या अभंग-रचनेवरचे सर्जनशील भाष्य आणि पुरातन भारतीय द्रष्टेपणावर केलेले समर्पक विवेचन हे हा लेख लिहिण्यामागचे प्रमुख उद्दिष्ट आहे. तुकारामांनी स्वत:च उद्धृत केल्याप्रमाणे 'कवित्व स्थिती' हा विषय या लेखाचे केंद्र आहे. मूळ मराठी अभंगरचना, चित्रे यांनी केलेले इंग्रजी भाषांतर आणि त्यानंतर लुट्झ यांनी केलेले जर्मन भाषांतर अशा विविध भाषांमध्ये झालेल्या निवडक कवितांच्या भाषांतरामधून, त्यातील अभंगरचनेमधील काव्य तसेच सामाजिक दृष्टिकोन यांतील लवचीकतेचा येथे परिचय करून दिला आहे.

सतराव्या शतकातील तुकाराम थोर संत म्हणून भारतीय लोकमानसाकडून गौरविले गेले होते. भक्ती त्यांच्या परमोच्च सुखाचे निधान होते. संतांमधील द्रष्टेपण आणि





अनुक्रमणिका

कवीतील कवित्व या दोन्ही शक्ती तुकाराम नावाच्या एकाच व्यक्तीत सामावलेल्या होत्या. त्यांनी त्यांच्या काव्यातून धार्मिक, आध्यात्मिक विचारसरणी प्रस्थापित केली होती. त्यांचे अभंग धर्माच्या बौद्धिक आणि तात्त्विक अंगाने लिहिलेले नव्हते. ते मानव-धर्माचे पुरस्कर्ते होते. त्यांच्या कवितेत त्यांनी मराठी संस्कृतीतील भक्ती, तत्त्वचिंतन, समाजसुधारणा, विवेकवाद, विज्ञानवाद, पर्यावरणवाद, परिवर्तनवाद, धर्मसुधारणा या विविध विषयांवर सखोल चिंतन केलेले आहे. सतराव्या शतकातील काव्याला त्यांच्या काव्यरचनेने आयाम दिलेला आहे. या बहुआयामी काव्यशैलीमुळे, तुकारामांची काव्यरचना सौंदर्यवादीही झालेली आहे. मानवी नातेसंबंधातील तीव्रतेचे पडसाद त्यांच्या काव्यातून प्रकर्षाने उमटलेले दिसतात. हा तोच काळ होता, ज्या काळात मराठी साहित्याचा पाया रचला जात होता. विशेषत: काव्यशैलीला धुमारे फुटत होते. ही काव्यशैली तुकारामांच्या काव्यरचनेशिवाय पूर्णत्वाला जाऊच शकत नव्हती. त्यांनी मध्ययुगीन मराठी साहित्य आणि आधुनिक साहित्य यांना आपल्या लेखणीने जोडले. तुकाराम कीर्तनकार होते. कीर्तनकार ईशगुणगान करत असतानाच, समाजप्रबोधनाचे कार्य करत असतो. ज्ञानदेवांच्या विचारांचा अन्वयार्थ सांगतानाच तुकारामांनी लोकभाषेचा वापर करून बहुजन समाजाला पंढरपूरचा विठोबा या देवतेची उपासना करावयास प्रवृत्त केले. मध्ययुगीन काळापासून देवदेवतांच्या गर्दीमुळे आध्यात्मिक स्तरावर गोंधळ माजला होता. वारकरी संप्रदायाने परमतत्त्वाचा अवलंब केला होता. तुकारामांनी कीर्तनातून त्यांचे जवळपास ४००० अभंग तल्लीन होऊन लोकांपुढे गायिले. ४००० अभंगांची ''तुकारामाची गाथा'' हा द्रष्टा ग्रंथ आजही अभ्यासला जातो. त्यांचे अभंग नेहमीच वास्तवाचे भान करून देतात. ते नम्रपणे स्वत:ला काव्यप्रतिभेचे माध्यम समजतात. ते लिहितात, ''तुका म्हणे मज बोलवितो देव''. त्यांच्यातील संतत्व आणि कवित्व, मराठी काव्यरचनेतील काव्य-सिद्धांत ठरले आहेत. त्यांनी लिहिलेली सुभाषिते, अवतरणे, म्हणी आज एकविसाव्या शतकातही प्रचलित आहेत. शब्दांचा उपयोग हा शास्त्र आणि शस्त्र असा दोहोंसाठी होऊ शकतो. समाजप्रबोधन करताना त्यांचे शब्द प्रसंगी तीक्ष्ण बाण होतात. त्या वेळी ते कोणाचाही मुलाहिजा ठेवत नाहीत. ती त्यांची युद्धनीती असते. भक्तिधर्माचे शास्त्र सांगताना त्यांचे शब्द लडिवाळ होतात. मनातील/कल्पनेतील विठोबाशी एकरूप होतात. त्यांची काव्यरचना प्रसंगी तीक्ष्ण, धारदार असली तरी स्वानुभवातून ती प्रसवलेली असल्याने, आत्मसंघर्ष करून, साक्षात्कारी झालेलीही दिसून येते.

तुकारामांना स्वप्नातून साक्षात्कार झाला. संत नामदेव पांडुरंगासमवेत तुकारामांच्या स्वप्नात आले. त्यांनी तुकारामांना कवित्व करण्याची आज्ञा दिली. मात्र ही आज्ञा सशर्त होती - ''वाउगे निमित्य'' न बोलण्याची. तसेच वेळ न घालवता नामदेवांनी





अनुक्रमणिका

रचलेल्या रचनांपुढे शत कोटी रचना रचण्याचा तुकारामांना स्वप्नादेश झाला. नामदेवांचे उरलेले कार्य पूर्णत्वास नेण्यास त्यांना स्वप्नादेशाने सांगितले. तुकारामांचे ४००० अभंग हे त्या आज्ञेचे पूर्ण स्वरूप आहे. हे अभंग तुकारामांच्या स्वानुभावातून अभिव्यक्त झालेले आहेत.

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ।।१।।
सांगितलें काम करावें कवित्व । वाऊगें निमित्य बोलों नको ।।२।।
माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ।।३।।
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले शेवटीं लावी तुका ।।४।।

(दातार, १९९९:१६१)

इंग्रजी भाषांतर :

I was only dreaming
Namdeo and Vithal
Stepped into my Dream.
"Your job is to make poems,"
Said Namdeo
"Stop fooling around,"
Vithal gave me the measure
And slapped me gently
To arouse me
From my dream
Within a dream
"The grand total
Of the poems Namdeo vowed to write
Was one billion," he said
"All the unwritten ones, Tuka,
Are your dues."

(चित्रे, १९९१:३)

जर्मन भाषांतर :

Es war bloβ ein Traum
Namdeo and Vithal
Erschienen mir im Traum
mach du gefalligst Gedichte
Sagte Namdeo

Hor auf deine Zeit zu vergeuden
Vitthal gab mir das Versamaβ
und einen Klaps
um mich zu wecken
aus meinem Traum
Im Traum
die Gesamtsumme
der Gedichte die Namdeo zu schreiben gelobte
war eine Billion sagte er
Alle ungeschriebenen, Tuka
Fallen auf dich

(चित्रे १९९९:१९)

आणि यामुळेच त्यांनी आयुष्यभर अभंगरचना केल्या. त्यांच्या कवितेचा आशय हा त्यांनी प्रपंच आणि परमार्थ साधताना केलेला भौतिक संघर्ष व आत्मसंघर्ष होता. त्यांनी त्यांच्या कवितेतून विशिष्ट घटना किंवा निव्वळ गावगप्पा व्यक्त केल्या नाहीत, तर गोष्टीवेल्हाळ स्वरूपात, गोड गळ्याने कीर्तने केली. त्यांनी इतर साहित्यस्रोतांना आणि प्रथांना जोडून दृष्टांत दिले. ते त्यांच्या कवित्व स्थितीच्या मूलभूत आशयाशी एकनिष्ठ राहिले.

प्रपंच, निसर्ग आणि समाजजीवन या भौतिक जगात वावरताना आत्मसंघर्षातून निर्माण झालेली सामान्य जन व प्राणिमात्रांवरील अपार करुणा यांतून त्यांना अभंग स्फुरले. या भौतिक जगात अभंगातील शब्दांवरच त्यांची मालकी आहे असे तुकारामांचे म्हणणे आहे. हे शब्द त्यांच्यासाठी सर्वकाही आहेत. त्यांचा खजिना, त्यांचे जडजवाहीर शब्दच आहेत. दैनंदिन जीवनातील गरजाही हे शब्दच भागवित आहेत. या शब्दसंपत्तीच्या साहाय्याने त्यांनी सामान्यजनांचा उद्धार केला. शब्द आणि देव यांत तुकारामांना दुजाभाव दिसून येत नाही. शब्द म्हणजेच देव, देव म्हणजेच शब्द. ते शब्दांना पूजतात आणि ते स्वत:ही त्यांच्या शब्दलालित्यामुळे पूजिले जातात. त्यांचे शब्द अपार करुणेने विठ्ठलाला आळवतात. विठ्ठलच त्यांच्या शब्दांना साकारतो, असा त्यांचा विश्वास आहे. अभंग स्फुरल्यावर शब्दांचा अर्थ, काव्यातील शब्दांची अचूक जाण व जागा, शब्दांची मूल्यात्मकता तसेच सूत्रात्मकता, यांचा विचार काव्य लिहिताना कवी करतोच; पण शब्द स्फुट रूपात वापरताना, कवी आपल्या भावनांना डोळसपणे बघतो. तुकारामांच्या शब्दात सांगायचे तर त्यांचे काव्य विठ्ठलाकडून बोलविले गेले आहे. ते फक्त माध्यम आहेत.





अनुक्रमणिका

तुकारामांच्या 'शब्द' या जाणिवेचा विचार करताना त्या जाणिवेचा शोध घ्यावा लागतो. त्यांची जाणीव म्हणजे पांडुरंगाशी ओळख. कवीला शब्दार्थाचा संबंध आणि व्याकरणातील शब्दांचा वापर याची समज तर असते, याबरोबर शब्दांनी समृद्ध होणाऱ्या काव्याचीही समज असते. शब्दांची निर्मिती, शब्दसंचय, हा सत्य आणि वास्तव यांच्या सृजनासाठी केला जातो याची खात्री तुकारामांनी निःसंदिग्धपणे पटवली. गंगाधर देवराव खानोलकर यांच्या ''दि न्यू स्टँडर्ड डिक्शनरी'' या शब्दकोशात ''शब्द'' या शब्दाचे आठ अर्थ दिले आहेत. उच्चार, एखाद्या वस्तूचा, कल्पनेचा दर्शक किंवा व्यंजक, जो अक्षर समूह तो, प्राथमिक विभक्ती ज्यावरून होतात अशी वर्णानुपूर्वी, बोल, ठपका, आज्ञा, हुकूम, प्रतिज्ञा, वचन, वाचा, ॐ, वेद, इ० इंग्रजी भाषेतही ''शब्द'' या शब्दाचे विविध अर्थ आहेत. उपरोल्लेखित अर्थांशी साधर्म्य दाखविणारे काही अर्थ आहेत. जर्मन भाषेतही तसेच. भाषा कुठल्याही असोत, शब्दांतून जी काव्यनिर्मिती होते त्या काव्याचा आशय सर्व भाषांमध्ये सारखाच असतो.

कवी, भाषांतरकार, निबंधलेखक, चित्रपट-निर्मते या विविध नात्यांनी संपूर्ण भारतात प्रसिद्ध असलेले दिलीप चित्रे यांनी तुकारामांचे अभंग इंग्रजीत ''सेज तुका'' या नावाने भाषांतरीत केले आहेत. त्यांचे मराठी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांवर प्रभुत्व आहे. तुकारामांच्या अभंग-रचनेमध्ये त्यांचे अनुभव व त्यातून निर्माण झालेला आत्मसंघर्ष, या आशयातून केलेल्या अभंगरचना या स्वाभाविकच तुकारामांचे ''स्व'' विषद करतात. तुकारामांचा हा ''स्व'' दिलीप चित्रे यांच्या मराठीतील अभंगरचनांच्या वर्णनामध्ये ठळकपणे दिसून येतो. जेव्हा या रचना चित्रे इंग्रजीमध्ये भाषांतरीत करतात, तेव्हा तुकारामांचे जीवनानुभव व त्यातून निर्माण झालेला आत्मसंघर्ष विश्वव्यापी झालेला दिसून येतो. या रचनांमधून तुकाराम हे निवेदक म्हणून रचना करताना दिसून येतात. इंग्रजीतील भाषांतरीत या अभंगरचना जर्मन कवी लोथार लुट्झ यांना भावतात. दिलीप चित्रे यांनी भाषांतरीत केलेले तुकारामांचे अभंग जेव्हा लोथार लुट्झ जर्मन भाषेत भाषांतरीत करतात तेव्हा ते म्हणतात की, मराठी व इंग्रजी या भाषा, तुकारामांच्या काव्याच्या दोन बाजू मांडतात : तुकाराम हे भारतीय असून स्थानिक प्रथांमधील अणूरेणूंनी त्यांचे जीवन व्यापलेले आहे. त्याच वेळेला जागतिक पातळीवरही त्यांची अधिसत्ता आहे. अर्थ समजून घेण्यासाठी, चित्रेंचे अभिप्राय अत्यंत लवचीक आहेत. काव्यातील लवचीकता चित्रेंच्या इंग्रजी भाषांतरात दिसून येते. त्यांनी सदर अभंगरचना इंग्रजीत भाषांतरीत करताना कवीला अभिप्रेत असणाऱ्या सर्जनशील स्वातंत्र्याची मोकळीक घेतली आहे.

आम्हां घरीं धन शब्दाचींच रत्नें । शब्दाचींच शस्त्रें यत्न करूं ।।१।।
शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वाटूं धन जनलोकां ।।२।।

तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव । शब्देंची गौरव पूजा करूं ।।३।। (३३९६)
(दातार १९९९:२९८)

इंग्रजी भाषांतर :

Words are the only jewels I possess
Words are the only clothes that I wear
Words are the only food that sustain my life
Words are the only wealth I distribute among people
Says Tuka Witness the Word he is God
I worship Him with my Words

(चित्रे, १९९१:४)

जर्मन भाषांतर :

Worte sind die einzigen
Juwelen die ich besitze
Worte sind die einzigen
Kleider die ich trage
Worte sind die einzige Nahrung
Die mein Leben erhalt
Worte sind der einzige Reichtum
Den ich unter die Leute verteile
Sagt Tuka
Sehet das Wort
Es ist Gott
Ich huldige ihm
Mit meinen Worten (चित्रे, १९९९:५)

दिलीप चित्रे यांच्यासमोर तुकारामांच्या अभंगांचे भाषांतर करताना बरेच प्रश्न निर्माण झाले याचे मुख्य कारण म्हणजे मूळ हस्तलिखित उपलब्ध नव्हते. ते म्हणतात. भाषांतरीत कविता लक्ष्यभाषेतील तिच्या प्रतिकृतींपैकी एक सलगीची अनोळखी आहे. ("A translated poem is at best, an intimate stranger among its counterparts in the target language") उदाहरण द्यायचे तर काही संदर्भात नक्की कोणता शब्द आहे हे ठरविणे अत्यंत अवघड आहे; कारण काही पाठांत शास्त्रे असा शब्द आहे, तर काही पाठांत शस्त्रे. दिलीप चित्रे यांनी हा शब्द वस्त्रे असा घेऊन त्याचे भाषांतर क्लोद्ज असे केले आहे. जर्मन भाषांतरात लोथार लुट्झ यांनी क्लोद्ज हा हाच शब्द गृहीत धरून त्याचे भाषांतर क्लायडर असे केले आहे.

भाषांतरकाराला त्याचे सर्जनशील स्वातंत्र्य आणि स्वत:ची यथार्थता स्वीकारण्याचे स्वातंत्र्य असते असे दिलीप चित्रे यांचे मत आहे. ''तुकारामाचे भाषांतर करताना आपण फक्त काव्याचेच वहन करतो असे नाही तर झपाटलेल्या भाषेच्या नाट्यात्म विधीची पुनर्निर्मिती करत असतो.'' (''in translating Tukaram, we are not merely transporting poerty but recreating a dramatic ritual of "possessed" language'') याप्रमाणे दिलीप चित्रे यांनी तुकारामांचे फक्त यथार्थ वर्णनच केले नाही तर त्यांच्या ''सेज् तुका''मधून त्यांनी तुकाराम हे सतराव्या शतकातील भक्ती-संप्रदायातील भक्तिमार्गाचे थोर कवी होते हे युरोपमधील वाचकांना दाखवून दिले.

मानवाच्या मनाची चेतना जागृत करून ती संजीवक करण्याचे सामर्थ्य कवीत असते. भाषेतील प्रथेनिहाय तत्त्वे आणि प्राचीन शब्दांची कवीला समज असते, त्याचबरोबर भाषेतील बदलांची, भाषेतील संकराची, भाषेतील नव्या पदरांची जाणीव कवीला असते. तो नव्या रूपातल्या भाषेला कवितेच्या परंपरेत सामावून घेतो. कवीचे काव्य-सृजन हे ईश्वराने केलेल्या सृजनासारखे असते. त्याच्या काव्याने गावे, शहरे यांच्या वेशी जोडल्या जातात. जीवनानुभव घेतल्याखेरीज ईश्वर सामान्य मनुष्यप्राण्याला स्थिर आयुष्य बहाल करत नाही. हे जीवनानुभव घेताना कवी मात्र आत्मउन्नयन करत असतो. त्याची वेदना, त्याचे सुख, त्याचा तटस्थपणा त्याच्या कवितेत दिसून येतो. खालील उदाहरणात काव्यातील सत्य, काव्यातील समतोल दिसून येतो.

नाहीं सरों येत जोडील्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ।।१।।
सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येतो ।।२।।
काय अगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ।।३।।
तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनी ।।४।। (२७०६)
(दातार, १९९९:२४७)

इंग्रजी भाषांतर :

To arrange words
In some order
Is not the same thing
As the inner poise
That's poetry

The Truth of poetry
Is the truth
Of Being

Its an experience
Of truth
No ornaments
Survive
A crucible
Fire reveals
Only molten Gold
Says Tuka
We are here
To reveal
We do not waste words

(चित्रे, १९९१:३३)

जर्मन भाषांतर :

Worten
Eine bestimmte Ordnung zu geben
Ist nicht dasselbe
Wie das innere Gleichgewicht
Das Poesie heiβt

Die Wahrheit der Poesie
Ist die Wahrheit
Des Seins
Sie ist eine Erfahrung
Der Wahrheit

Schmuckelemente
Uberleben nicht
Bei einer Feuerprobe
Bleibt
Nur geschmolzenes Gold ubrig

Sagt Tuka
Wir sind hier
Zu offenbaren
Wir verschwenden keine
Worte

(चित्रे, १९९९:४१)

तुकारामांनी सोप्या सरळ भाषेतून जनमानसाला आवश्यक असलेल्या विचारसरणीला सोपे करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी दैनंदिन आयुष्यातील दिलेल्या साध्या सोप्या दृष्टांतामुळे त्यांचे काव्य समजण्यास अजूनच सोपे झाले आहे. उदाहरणादाखल नमूद केलेल्या कवितेतील ओळी अमूर्त विचारांना दृश्य स्वरूपात साचेबद्ध आकार किंवा प्रतिमेत साकारतात. हेच भाषांतरात देखील सहजसाध्य झाल्याचे दिसून येते.

तुकारामांनी स्वत: अनुभवलेल्या जीवनावरून काव्यरचना केली, म्हणूनच त्यांची काव्यरचना अस्सल होती. त्यांच्या काव्याला खोली होती. पोकळ गप्पा आणि बोजड अलंकारिक शब्दांना काव्यात जागा नसते. यामुळे काव्याचे मूल्य कमी होते. काव्यातला आशय हा तापलेल्या मुशीतून तावून सुलाखून निघालेल्या बावनकशी सोन्यासारखा असला पाहिजे. असा आशय तेव्हाच निर्माण होतो, जेव्हा जीवनानुभावातील चढउतारांचा संघर्ष कवी स्वत: करत असतो. कवीच्या कवित्वाच्या प्रवासात त्याने अनुभवलेले, सोसलेले अनुभव, तोंडाची वाफ घालवून निष्प्रभ करण्याची गरज नसते आणि खोटी सबब शब्दजंजाळाने लखलखीत करण्याचीही गरज नसते. तुकारामांनी स्वजीवनानुभव त्यांच्या काव्यातून मांडले. अशा अनुभवांचा भक्कम पाया असलेली कविता अभिजात कलाकृती असते. म्हणूनच तुकारामांचे काव्य कधीच कालबाह्य होणार नाही. ■

## संदर्भ


(१) कुलकर्णी, अ०रा० २००८. 'मेडीव्हल महाराष्ट्र', डायमंड प्रकाशन, पुणे.

(२) घैसास, दिवाकर. २००१. 'दैनंदिन तुकाराम गाथा', मनोरमा प्रकाशन, मुंबई.

(३) दातार, मुकुंद. १९९९. 'तुका म्हणे : श्री तुकारामांच्या निवडक ३६६ अभंगांचे भावार्थलेखन, स्नेहल प्रकाशन, पुणे.

(४) नेमाडे, भालचंद्र. १९९४. 'तुकाराम', साकेत प्रकाशन, औरंगाबाद.

(५) चित्रे, दिलीप. १९९९. 'वोर्ट देस तुकाराम्स' (भाषांतर - लोथार लुट्झ) म्युनिक : ए १ प्रकाशन.

(६) चित्रे, दिलीप. १९९१. 'सेज तुका-१ : सिलेक्टेड पोएम्स ऑफ तुकाराम', जॉनथायमर कल्चर असोसिएशन.

(७) जोग, विष्णुबुवा. (संपादक). १९९९. 'सार्थ तुकारामाची गाथा', सरस्वती ग्रंथ भांडार, पुणे.

(८) पाटील, तानाजीराव. २००८. 'समाजजीवनातील तुकाराम', पद्मगंधा, पुणे.

(९) सरदार, गं०बा० २००४. 'संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती', लोकवाङ्मय गृह, मुंबई.

(१०) सानप, किशोर. २००८. 'समग्र तुकाराम दर्शन', विजय प्रकाशन, नागपूर.



चलभाष : 9619135085

# भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण : महाराष्ट्र

**- केतकी मोडक**

महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार समितीमध्ये काम करण्याची संधी मला दिली याबद्दल सुरुवातीलाच मी मराठी अभ्यास परिषदेचे आभार मानू इच्छिते. प्रा० डॉ० चंद्रशेखर बर्वे आणि मी आम्ही दोघांनी मिळून हे काम पाहिले. वास्तविक त्यांनी येथे बोलणे अधिक योग्य ठरले असते. परंतु त्यांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे समितीच्या वतीने मी येथे बोलते आहे इतकेच.

आमच्या समितीने वर्ष २०१३ व २०१४ मध्ये प्रकाशित झालेल्या भाषाविषयक ग्रंथांचा धांडोळा घेतला आणि त्यातून श्री० अरुण जाखडे यांनी संपादित केलेल्या "भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण : महाराष्ट्र" या ग्रंथाची महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कारासाठी एकमताने निवड केली. या दोन वर्षांत श्री० सुधीर देवरे यांची अहिराणी बोलीवरील पुस्तके, "ज्ञानभाषा" हे श्री० सदाशिव देव लिखित पुस्तक अशी इतर काही पुस्तके देखील विचारार्थ होती. पण "भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण" या ग्रंथराजाचे मोलच अनमोल आहे, असे म्हणावे लागेल.

असे म्हणण्याचे कारण की, जॉर्ज ग्रिअर्सनने शंभर वर्षापूर्वी केलेल्या भाषासर्वेक्षणानंतरचे हे भारतातील पहिलेच इतक्या व्यापक स्तरावरील भाषासर्वेक्षण होय. त्याचे आणखी महत्त्वाचे वैशिष्ट्य हे की, ते लोकसहभागातून यशस्वी करण्यात आलेले आहे. पन्नास खंडात्मक लोकसर्वेक्षण मालिकेतील महाराष्ट्र खंड हा सतरावा खंड आहे. सुमारे तीन हजार लोक, साठ भाषा, चार वर्षे अव्याहतपणे चाललेले काम यातून हा ग्रंथ सिद्ध झाला आहे. या नुसत्या आकडेवारीवरूनही या प्रकल्पाच्या भव्यतेची कल्पना यावी.

शासनाच्या कोणत्याही मदतीशिवाय, स्वयंप्रेरणेने व स्वयंस्फूर्तीतून, केवळ लोकसहभागातून साकारलेला हा प्रकल्प म्हणजे भाषानिष्ठांच्या मांदियाळीची एक चळवळ आहे असेच म्हणावे लागेल. भाषिक हक्क संवर्धन, भाषेतील मौखिक परंपरा व दस्तऐवजीकरण करण्यासाठी कटिबद्ध असलेली ती चळवळ आहे. या निमित्ताने २०१० ते २०१२ या कालखंडातील महाराष्ट्राची भाषाविषयक पाहणी सिद्ध झाली आहे.

या खंडात एकूण चार भाग आहेत - (१) मराठी व मराठीची रूपे - ह्यात अकरा भाषांचा समावेश आहे. (२) आदिवासींच्या भाषा - ह्यात सोळा भाषांचा

समावेश आहे. (३) भटक्या-विमुक्तांच्या भाषा - या विभागात अठरा ते वीस भाषा समाविष्ट आहेत तर (४) या भागात अन्य भाषांचा समावेश आहे. अर्थात हा ग्रंथाचा गाभाभूत भाग असला तरी त्याला इतरही काही महत्त्वपूर्ण लेखांची व परिशिष्टांची जोड देण्यात आली आहे. त्यामुळे त्याचे उपयोगिता मूल्य अधिकच वाढले आहे.

या ग्रंथात श्रीमती सुषमा करोगल यांचा मराठीचा सर्वांगीण परिचय करून देणारा चाळीस पानी लेख आहे. श्री० अरुण जाखडे यांचे 'मराठी प्रकाशनव्यवहार : दोन शतकांची वाटचाल' व 'मराठी लिप्या' असे दोन लेख, तर श्री० हरी नरके यांचा 'मराठी भाषेच्या अभिजात दर्जाविषयी' हे तीन ससंदर्भ-लेख आहेत. तेही स्वतंत्रपणे अभ्यसनीय आहेत. शेतीची साधने, बलुतेदारांच्या बोलण्यातील, कृषिसंस्कृतीतील काही शब्द यांचाही परिशिष्टात समावेश करण्यात आला आहे.

आपल्या भाषांमधून शिक्षण, व्यवस्थापन तसंच संज्ञापन उत्तमरीत्या होऊ शकते असा आत्मविश्वास लोकांच्या मनात पुन्हा निर्माण करणे हे या लोकसर्वेक्षणाचे मुख्य उद्दिष्ट असल्याचे भूमिकेत नमूद केले आहे. आत्ताच्या काळात असे अत्यंत महत्त्वपूर्ण कार्य करणाऱ्या आपल्याच बांधवांची पुरस्काराच्या निमित्ताने पाठराखण करण्यात परिषदेला धन्यता वाटते. व्यावसायिक दृष्टीने काहीसा बेभरवशाचा पण भाषिक दृष्टीने आत्यंतिक मोलाचा असा हा दस्तऐवज प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकांच्या धाडसालाही दाद देण्याची ही एक संधी आहे, असे मला वाटते.

या प्रकल्पाविषयी बोलताना संपादक व त्यांचे सहकारी यांनी अत्यंत विनयाने काही विधाने केलेली आहेत. ते म्हणतात, हा प्रकल्प आजच्या स्थितीतील भारताच्या भाषिक वास्तवाची व सामाजिक, सांस्कृतिक बदलाची नोंद घेणारा आहे. तो त्या त्या भाषांचा अतिशय संशोधनात्मक अभ्यास वा सर्वेक्षण नाही. त्यांचे हे म्हणणे मान्य करून देखील असे म्हणावे लागेल की, भावी संशोधकांना आवश्यक असणारी अत्यंत पायाभूत अशी माहिती (सामग्री) या निमित्ताने त्यांच्या हाती लागली आहे.

येथे मला एका योगायोगाचे आश्चर्य वाटते. १९३१ साली बडोद्याच्या सयाजीराव गायकवाड यांच्या प्रेरणेतून श्रीसयाजी शासन-शब्द-कल्पतरू या एका महत्प्रकल्पाची निर्मिती झाली. ज्यामध्ये मराठी, संस्कृत, उर्दू, पर्शियन, हिंदी, बंगाली व गुजराती भाषांतील शब्दांची समांतर नोंद करण्यात आली. त्याच बडोद्यामध्ये भाषाविषयक अभ्यासासाठी डॉ० गणेश देवी यांनी 'भाषा संशोधन व प्रकाशन केंद्र' स्थापन केले. आणि तेथेच याही बृहद्प्रकल्पाचा श्रीगणेशा झाला, ही बाब लक्षणीय आहे.

श्रीसयाजी शासन-शब्द-कल्पतरूच्या रचनेचा काही अभ्यास आपण केला तर त्यातील शब्दांची समांतर मांडणी ही पद्धत अधिक उपयुक्त असल्याचे आढळून येते. माझा तेवढा अधिकार नाही याची मला जाणीव आहे; पण मराठी भाषेवरील प्रेमापोटी

एक सूचना येथे करावीशी वाटते. या प्रकल्पामध्येही अशा प्रकारची मांडणी करता आली असती तर ते काम तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीने अधिक सोयीचे ठरले असते. अर्थात साठ भाषांमधील शब्द असे समांतरपणे लिहिणे आणि ते मुद्रित करणे अवघड आहे, ह्याचीही मला जाणीव आहे. पण हेच काम आपण संगणकावर करावयाचे म्हटले आणि त्याला विकिपीडियासारख्या सर्वसामायिक साधनाची जोड द्यायची ठरविले, तर ते अशक्य मात्र नाही हेही लक्षात घ्यायला हवे. तसा प्रयत्न झाल्यास अभ्यासकांची मोठीच सोय होईल आणि भाषाविषयक अधिक काही तथ्ये सहज समोर येतील असे म्हणावेसे वाटते. उदाहरणच घ्यायचे झाले तर प्रमाणभाषेतील 'आई' हा एकच शब्द घेऊन तो इतर बोलीभाषारूपांमध्ये कसा येतो हे पाहणेही मनोरंजक ठरेल :

**आई**

| | | | |
|---|---|---|---|
| अहिराणी | - धैडी | आगर - आईस | |
| कोहळी व झाडी | - मा | खानदेशी लेवा | माय |
| चंदगडी | - आयी/बाय | तावडी | माय |
| मालवणी | - आवस/आये | पोळारी | माय |
| वाडवळी | - आई बा/बाय | वऱ्हाडी | माय |
| सामवेदी | - बय/दादय/दादी | | |

अशा तौलनिक अभ्यासाची अनेक दालनेच या बृहत् सर्वेक्षणातून अभ्यासकांपुढे खुली होणार आहेत.

राष्ट्रीय एकात्मता, एकसंधता या दृष्टीनेही या कामाचे महत्त्व जनमानसावर ठसणे आवश्यक आहे, असे डॉ० चंद्रशेखर बर्वे यांना वाटते. विशिष्ट शब्दकोशांची उपयुक्तता आहे आणि ती असतेच. तरीदेखील व्यापक, विशाल दृष्टितारतम्याच्या (पर्स्पेक्टिव्ह) दृष्टीने असा पल्लेदार सर्वेक्षणाच्या द्वारे दूरगामी फलनिष्पत्तीची शक्यता अधिक असते असेही त्यांना वाटते. या भूमिकेतून त्यांनाही हा ग्रंथ पुरस्कारासाठी योग्य वाटला.

लेखक, समन्वयक, प्रकाशक, संपादक, इ० विविध भूमिकांमधून या ग्रंथाच्या द्वारे अभिव्यक्त होणाऱ्या श्री० अरुण जाखडे यांचा या निमित्ताने सन्मान होतो आहे ही एकूणच मराठी समाजाच्या दृष्टीने विलक्षण समाधानाची बाब आहे, असे येथे जरूर नमूद करावेसे वाटते.

पुनश्च एकदा पुरस्कार समिती, अभ्यास परिषद आणि माझ्या वैयक्तिक वतीने ह्या प्रकल्पात सहभागी झालेल्या सर्व कार्यकर्त्यांचे मी मनापासून अभिनंदन करते. ■

[ पारितोषिक-वितरण कार्यक्रम पुणे येथे धन्वंतरी सभागृह २३ जानेवारी २०१६ रोजी पार पडला. ]

चलभाष : 9421016089

# बोलतीपुस्तके.ब्लॉगस्पॉट.इन

**- श्रद्धा काळेले**

पु०ल० देशपांडे, व०पु० काळे, द०मा० मिरासदार, तसेच शंकर पाटील ह्यांचे कथाकथन, गो०नी० दांडेकर ह्यांच्या साहित्याची काही अभिवाचने ह्यांसारखे थोडेफार अपवाद वगळले तर मराठी साहित्य श्राव्य स्वरूपात फारसे उपलब्ध नाही. मराठी माणसाला वाचनाची गोडी असली तरी धकाधकीच्या ह्या काळात त्याच्याकडे वेळ नाही. ह्या गोष्टींवर तोडगा म्हणून आनंद वर्तक ह्यांनी बोलत्या पुस्तकांचा एक अभिनव उपक्रम राबवला आहे आणि त्या उपक्रमांतर्गत आपल्याला त्यांच्या अनुदिनीवर (ब्लॉगवर) म्हणजे http:/boltipustake.blogspot.in/ वर मराठी पुस्तके ऐकता येतात. नावाप्रमाणेच ह्या ब्लॉगवर मराठीची बोलती पुस्तके ठेवलेली आहेत. ह्या अनुदिनीवर साने गुरुजी ह्यांची 'अमोल गोष्टी' व 'श्यामची आई' ही पुस्तके, महात्मा गांधींचे 'सत्याचे प्रयोग' हे पुस्तक तसेच लक्ष्मीबाई टिळकांचे 'स्मृतिचित्रे', कृष्णाजी गोखले ह्यांनी रूपांतरित केलेले 'प्राईड ॲण्ड प्रेजुडीस' अशी मूळ आणि भाषांतरित पुस्तके ऐकता येतात. तूर्त २२ बोलती पुस्तके (MP3 धारिकेच्या स्वरूपात) ह्या संकेतस्थळावर ठेवली आहेत. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे ही पुस्तके थेट संकेतस्थळावरून ऐकता येतात किंवा ती उतरून घेऊनसुद्धा ऐकता येतात. उतरून घेतानासुद्धा पुस्तकातील प्रकरणे सुटी सुटी उतरून घेण्याची सोय आहे. मुख्य म्हणजे ह्या सर्व सोयी अगदी मोफत आहेत. साहित्याचे अभिवाचनही चांगले केलेले आहे. उदा० इसापच्या गोष्टींचे वाचन अगदी गोष्ट सांगावी तशा स्वरूपात केलेले आहे आणि ते एकाच आवाजात न करता वेगवेगळ्या आवाजांत केल्यामुळे-श्रवणीय झाले आहे. इतर पुस्तकांचे वाचनसुद्धा मनापासून केलेले दिसते. सर्व ध्वनिफितींत उच्चार नेटके आहेत आणि वाचन सुस्पष्ट व श्रवणीय आहे. पुस्तके वाचणाऱ्यांची नावे सर्व पुस्तकांबरोबर दिली आहेत. तर काही अभिवाचकांचे इ-टपाल-पत्तेही (इमेल ॲड्रेस) दिलेले आहेत.

ह्या ब्लॉगवर बोलत्या पुस्तकांची यादी पानाच्या डावीकडे दिलेली आहे. विशिष्ट पुस्तकावर टिकटिकवल्यास (क्लिक केल्यास) त्यातील श्राव्य प्रकरणे वा गोष्टी ह्यांची यादी पानाच्या उजवीकडे दिसते. ह्या उजवीकडील यादीत श्राव्य धारिका उतरून घेण्याची सोय आहे. तर पानाच्या मधोमध थेट (ब्लॉगवरूनच) ऐकण्यासाठीच्या धारिकांची यादी दिसते. त्यांतील धारिकेवर टिकटिकवल्यास ती धारिका ऐकता येते.

कॉपीराईट ॲक्टमुळे, ह्या ब्लॉगवर फक्त सार्वजनिक पुनर्मुद्रणासाठी उपलब्ध असलेली पुस्तकेच बोलत्या माध्यमात आणली आहेत. ह्या ब्लॉगच्या दुसऱ्या पानावर काही संकेतस्थळांची यादी दिली आहे. त्या संकेतस्थळांवर जुनी मराठी पुस्तके छायाचित्रित (स्कॅन) करून ठेवलेली आहेत. इच्छुक व्यक्ती ह्या मराठी पुस्तकांच्या यादीतून त्यांना आवडणारे एखादे पुस्तक ध्वनिमुद्रित करण्यासाठी निवडू शकतात. ऑडॅसिटी ही मोफत मिळणारी आणि ध्वनिमुद्रणासाठी वापरायला अगदी सोपी अशी आज्ञावली आहे. ह्या आज्ञावलीच्या संकेतस्थळाचा दुवा देखील ह्या ब्लॉगवर दिला आहे.

वापरणाऱ्याच्या दृष्टीने अनुदिनीवर बऱ्याच सुधारणांना वाव आहे. त्यांपैकी काही गोष्टी खाली नोंदवल्या आहेत.

( १ ) थेट ऐकण्यासाठीच्या धारिकांची नावे देताना त्यांत कोणतेही ठरावीक धोरण नाही. एकीकडे ऐकण्यासाठीच्या आणि उतरून घेण्याच्या धारिकांची नावे एकसारखी देण्यात आली आहेत. (थेट ऐकण्यासाठीच्या धारिकांची नावे देवनागरीत नसून रोमीत आहेत.) तर 'सूर्यपुत्र लोकमान्य' ह्या पुस्तकाच्या ऐकण्यासाठीच्या धारिकांची नावे lokamanya01, lokamanya02 अशी देण्यात आली आहेत. त्यामुळे त्यात कोणता मजकूर आहे हे नावावरून कळत नाही. 'आगरकर दर्शन' ह्यात ऐकण्यासाठीच्या धारिकेचा आणि उतरून घेण्याच्या धारिकेचा क्रम खालीवर झाला आहे. त्याचबरोबर धारिकेचे नावसुद्धा वेगवेगळ्या पद्धतीने दिले आहे. उदा० धारिका क्रमांक ४चे नाव Vacan - G. G. Agarkar तर धारिका क्रमांक ६चे नाव Vishushastri Chiplunkar - Bolti Pustake आणि धारिका क्रमांक १४चे नाव Mul Paya Bhakkam Pahije - Gopal Ganesh Agarkar अशी आहेत.

( २ ) थेट ऐकण्यासाठीच्या धारिकांची नावे देवनागरीत नसून रोमीत आहेत. ती देवनागरीत झाली तर फार सोयीचे होईल.

( ३ ) इतर पानांवरून मुख्य पानावर थेट जाण्याची सोय नाही.

( ४ ) सध्या ह्या उपक्रमात सहभागी असलेल्या लोकांबद्दल ब्लॉगवर त्यांच्या नावांव्यतिरिक्त कोणतीही माहिती नाही.

काहीही असले तरी मराठी पुस्तकांसाठी मराठी माणसांनी राबवलेला हा उपक्रम अगदी विलक्षण आहे. वाचनाची गोडी असलेल्या पण कामामुळे त्यासाठी वेळ न मिळणाऱ्यांसाठी, त्याचबरोबर ज्यांना मराठी वाचणे नीट जमत नाही अशांसाठी, दृष्टी अधू असणाऱ्यांसाठी, वृद्धांसाठी फारच उपयोगी सामग्री ह्या ब्लॉगवर आहे.

ह्या उपक्रमाला अनेक लोकांनी हातभार लावण्याची गरज आहे. सध्या हा उपक्रम अगदी बाल्यावस्थेत आहे. ह्यावरील साहित्याची मांडणी अजून नेटकी करण्याची गरज





अनुक्रमणिका

आहे आणि ह्यावरील श्राव्य पुस्तकांत अधिक भर घालण्याची आवश्यकता आहे. श्राव्य पुस्तकांबरोबर जर त्यांचे टंकलेखनही उपलब्ध झाले तर ते मराठी शिकत असणाऱ्यांसाठीसुद्धा फार उपयोगाचे होईल. आणखी म्हणजे ह्यावर अजून कोणकोणती पुस्तके नजीकच्या काळात ऐकता येणार आहेत त्यांची पण यादी ह्या ब्लॉगवर टाकायला हवी म्हणजे ऐकणारे/वाचक ह्यांना उत्सुकता वाटत राहील. शेवटची विनंती अशी की ''ह्या उपक्रमात जास्तीत जास्त लोकांनी सहभाग देऊन येथील साहित्य समृद्ध करावे आणि मराठी माणसांनी मराठी माणसांसाठी चालवलेल्या ह्या उपक्रमाला भरभरून प्रोत्साहन द्यावे.'' ■

चलभाष : 9766542256

वर्ष ३३, अंक ४ (दिवाळी २०१५)मधील महत्त्वाच्या चुकांची दुरुस्ती

| पृष्ठ | ओळ | ऐवजी | असे वाचावे |
|---|---|---|---|
| १० (वरून) | १० | पट पुत्र | पठ पुत्र |
| १० (वरून) | १३ | (कुर्भे) | (कुत्रे) |
| १३ (वरून) | २ | - | वाचन म्हणजे |
| १३ (खालून) | ८ | त्या लिहिलेली | त्या लिपीत लिहिलेली |
| १७ (वरून) | १२ | त्याद्वारे | तिच्याद्वारे |
| १८ (वरून) | १४ | त्याच्यापासून | तिच्यापासून |
| १८ (खालून) | ९ | पण | - |
| २१ (वरून) | ५ | एकतर | - |
| २१ (खालून) | ३ | वाणवाच | वानवाच |
| २२ (वरून) | १२ | घेतात | करतात. |
| २३ (वरून) | २-३ | त्यांची काव्य... ठेवणारं आहे. | काव्य आणि भाषेविषयींच्या त्यांच्या संकल्पना आणि त्यांचे एकमेकींशी असलेले नाते या तीनही गोष्टी गुंतवून ठेवणाऱ्या आहेत. |
| २३ (वरून) | १२-३३ | शेवटी पहा... | (लेखाच्या शेवटी पृष्ठ ३४ वर पहा : भूर्जपत्रमधील पंक्ती) |
| ४२ (वरून) | ६ व ७ | हे काम | - |
| ४९ (वरून) | ९ | पश्चिनी | पश्चिम |





अनुक्रमणिका

## परिषद वार्ता

**- विजया चौधरी**

दरवर्षी बँक ऑफ महाराष्ट्राच्या सहकार्याने, मराठी अभ्यास परिषदेतर्फे 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार' दिला जातो. वर्ष २०१५च्या पुरस्कारासाठी ''भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण : महाराष्ट्र'' या अरुण जाखडे यांनी संपादित केलेल्या पुस्तकाची निवड करण्यात आली होती. पुरस्कार-वितरण समारंभ २३, जानेवारी २०१६ रोजी धन्वंतरी सभागृह, पुणे येथे सायं. ५ वाजता संपन्न झाला. प्रमुख पाहुणे म्हणून डॉ० नागनाथ कोत्तापल्ले उपस्थित होते. त्यांच्या हस्ते पुरस्काराचे वितरण करण्यात आले.

कार्यक्रमाची सुरुवात मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह डॉ० आनन्द काटीकर यांच्या प्रास्ताविकाने झाली. त्यानंतर पुरस्कार समितीच्या निमंत्रक या नात्याने डॉ० कल्पना कुलकर्णी यांनी परिषदेची पुरस्कार देण्यामागची भूमिका विषद केली. परीक्षक डॉ० चंद्रशेखर बर्वे व डॉ० केतकी मोडक यांनी एकमताने वरील पुस्तकाची निवड केल्याचे सांगितले. परीक्षक या नात्याने डॉ० केतकी मोडक यांनी पुरस्कारप्राप्त पुस्तकाविषयी आपले विचार मांडले. भारतातील पहिलेच व्यापक स्तरावरील सर्वेक्षण असल्याचे सांगून, स्वयंप्रेरणेने, स्वयंस्फूर्तीतून साकारलेला व लोकसहभागातून यशस्वी झालेला प्रकल्प म्हणून याचे महत्त्व असल्याचे त्या म्हणाल्या. (त्यांचे भाषण आम्ही लेखस्वरूपात या अंकात देतच आहोत.) पुरस्कार वितरणानंतर श्री० अरुण जाखडे यांनी ग्रंथाचे संपादक या नात्याने आपले मनोगत व्यक्त केले. संपादन करताना आलेले अनुभव त्यांनी सांगितले.

डॉ० नागनाथ कोत्तापल्ले यांनी आपल्या भाषणात डॉ० गणेश देवी यांनी केलेल्या लोकसर्वेक्षणाच्या कामाची आणि श्री० जाखडे यांनी केलेल्या संपादनाची प्रशंसा केली. श्री० जाखडे यांना हे काम करताना आलेल्या अनुभवांवरही पुस्तक होऊ शकेल असे ते म्हणाले. भटके-विमुक्त यांची भाषा, संस्कृती, आदिवासी संस्कृती इत्यादींच्या स्थलांतरणाच्या अंगाने विचार करता येऊ शकेल असे सांगून, मराठीमध्ये तयार केलेल्या शब्दांत कधीकधी येणारी अर्थहीनता टाळण्यासाठी बोलींची मदत होऊ शकेल असे मत त्यांनी व्यक्त केले.

संस्थेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांनी अध्यक्षीय समारोप केला. हे पुरस्कार-प्राप्त सर्वेक्षण भाषानिहाय नसून प्रदेशनिहाय असल्याचे सांगून मराठी लिप्या, इतिहास, नावंही न ऐकलेल्या अनेक भाषा इ० गोष्टींचा समावेश असलेले हे एक अत्यंत महत्त्वाकांक्षी सर्वेक्षण असल्याचे त्यांनी नमूद केले. डॉ० आनन्द काटीकर यांच्या आभार-प्रदर्शनाने कार्यक्रमाची सांगता झाली. ■





अनुक्रमणिका

प्रतिसाद १

## संपादकीय धक्का

वर्ष ३४ अंक १ (हिवाळा २०१६), या अंकाचे संपादकीय वाचून धक्का बसला. विद्वत्प्रमाणित त्रैमासिक म्हणवणाऱ्या या नियतकालिकात हे संपादकीय? पाण्यावरचं हे संशोधन कोणत्या 'इंडेक्स्ड जर्नल'मध्ये आले आहे? तसे जर ते असते तर संशोधकाला नोबेल मिळाले असते!

**आनंद जोशी**

प्रतिसाद २

## खुलासा

आपल्या समाजात प्राचीन काळापासून चालत आलेला - परंपरा असे म्हटला जाणारा आणि नव्या शिक्षणव्यवस्थेने स्थिरावलेला - आधुनिक म्हटला जाणारा असे दोन्ही विचारप्रवाह एकाच वेळेस विद्यमान आहेत. माझ्या 'शुभ बोल नाऱ्या' या संपादकीय लेखाचा विषय भाषा आणि सामाजिक संकेत यांवर आधारलेला आहे. भारतीय समाजात आपल्या बोलण्याविषयी जे संकेत आलेले आहेत, त्यांची कारणमीमांसा करताना आपण प्रत्येक गोष्टीत चैतन्य असते, यावर भर देतो हेच मला सांगायचे आहे. आपली परंपरा सुटासुटा विचार करत नाही तर एकात्म विचार करते. ह्या विषयाच्या अनुषंगाने पाणी सजीव असते या माशुरो इमोटो यांच्या संशोधनाचा संदर्भ आलेला आहे. ते संशोधन नोबेल पारितोषिकप्राप्त का झालेले नाही, हा माझ्या अभ्यासाचा भाग नाही आणि माझ्या लेखाच्या संदर्भाला त्याची गरजही नाही. भारतीय परंपरा आपल्या आजूबाजूच्या प्रत्येक गोष्टीत चैतन्य आहे असे मानते ह्या माझ्या विधानाच्या समर्थनामागे सदर संदर्भ महत्त्वाचा वाटला, म्हणून तो मी दिलेला आहे. संपादकीयात अखेरीस माशुरो इमोटो यांच्या संकेतस्थळाचा आणि यु ट्यूब वाहिनीचा संदर्भ द्यायचा राहिला आहे, तो आत्ता येथे नोंदवत आहे.

www.masaru-emoto.net/english/water-crystal.html

https:/www.youtube.com/watch?v=tAvzsicBtx8

**आनन्द काटीकर**

वर्ष ३४, अंक १ (हिवाळा २०१६) मधील महत्त्वाच्या चुकांची दुरुस्ती

| पृष्ठ | ओळ | ऐवजी | असे वाचावे |
|---|---|---|---|
| मुखपृष्ठ | २ | वर्ष ३५ | वर्ष ३४ |
| ३ (वरून) | ७ | विशेषण | विशेषणे |
| ५ (खालून) | २ | अंतर्मन | मन |
| ६ (खालून) | २ | पक्षासारखे | पक्ष्यासारखे |
| ७ (वरून) | १० | असो | असोत, |
| २० शीर्षक | - | विशेषण | विशेषणे |
| २० (वरून) | १६ | व्यक्तिमत्वाबद्दलची | व्यक्तिबद्दलची |
| २० (वरून) | १८ | विशेषण | विशेषणे |
| २० (खालून) | ५ | निहाय मुख्यत्वे | यानुसार |
| २० (खालून) | ५ | विशेषण | विशेषणे |
| २१ (वरून) | ४ | व्यवहारात | - |
| २१ (वरून) | ६ | विशेषण | विशेषणे |
| ३५ (खालून) | ६ | वाद | वद |
| ३६ (वरून) | ५ | अवलंबून | - |
| ३६ (वरून) | १२ | ब्राह्मी | ब्रह्मी |
| ३६ (खालून) | ४ | अनवाद | अनुवाद |
| ३९ (वरून) | ७ | त्याच्या | त्यांच्या |
| ३९ (वरून) | ७ | हवा. | हवा, |

## इंग्रजी आणि मराठी

इंग्लिश भाषेत आदरवाचक सर्वनामच नसल्यामुळं एखाद्या देशाचा पंतप्रधान असो नाहीतर एखादा लहान मुलगा असो, त्याचा उल्लेख आपण He असाच करतो. मराठीत मग पंचाईत होते. या ठिकाणी तारतम्य बाळगावंच लागतं.

- लीना सोहोनी, 'दै० सकाळ', रविवार, दि० २१ फेब्रुवारी २०१६

## लेखकांना विनंती

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे, ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतर आधी द्यावे आणि नंतर पदटीप म्हणून किंवा कंसात इंग्रजी अवतरण द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए०आर०' नको; 'अ०रा०' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी.

लेखकाने आपले लेखन इतरत्र कुठल्याही नियतकालिकात, दैनिकात वा माध्यमात प्रकाशित झालेले नाही, प्रकाशित होण्यासाठी पाठवले गेलेले नाही वा प्रकाशित होण्याच्या प्रक्रियेत नाही, असे स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे.

## संदर्भ कसे द्यावेत?

संदर्भ देण्याची सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.





अनुक्रमणिका

## पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ०)

भाषाविज्ञान

भाषांतर

शैली (व्यवहारातील व साहित्यातील)

भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन

परिभाषा

भाषिक वर्तन

भाषाविषयक शैक्षणिक व शासकीय धोरणे

पुस्तक-परीक्षणे

पानपूरके

पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया

आपली भाषिक प्रचीती

मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायाविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये

मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम

कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण

कवितेची भाषा

साहित्याची भाषा

परिभाषाकोशांचा परिचय इत्यादी.

संपर्क :
**संपादक** : प्र० ना० परांजपे, एच्-1, क्लॅरियन पार्क, पुणे 411067.
**(M) 9422509638**
इ-पत्ता : pranaparanjpe@gmail.com.





अनुक्रमणिका

